संगीत

# पंढरपूर

लेखक,

विश्वनाथ गोपाळ शेट्ये,

बी. ए., एल् एल्., बी.

लोकशासन, जुगारी जग, रामरहीम, रक्षाबंधन, नादी नारद,
गोवा लॉटरी इ० नाटकांचे कर्ते

४ मे १९४०

किंमत १२ आणे

रत्नागिरी येथील

२४ व्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे

अध्यक्ष

**प्रो. ना. सी. फडके,** एम्. ए.

यांना

हे नाटक

" न्यून तें पुरतें, अधिक तें सरतें,
करुनि घेयावें हें तुमतें, विनवितु असें."

या

श्री ज्ञानदेवांच्या पवित्र शब्दांत

विज्ञप्तिपूर्वक

**समर्पण !**

# हृद्गत

या महाराष्ट्रात श्रीज्ञानेश्वराच्या कालापासून आजपर्यंत जे वैष्णवपंथीय वारकरी सांप्रदायिक संत होऊन गेले, त्यांत नाट्यविषयक यशस्विता व हृदयंगमता या दृष्टीनें सुद्धां तुकाराम महाराज हे संतमुकुटमणी होत. राजापुरकर नाटक मंडळीचा अगर शाहुनगरवासी नाटक मंडळीचा तुकाराम तर राहोच पण हल्लींच्या बोलपट सृष्टींत प्रभातचा 'तुकाराम' माझ्या या विधानाची सत्यता आज प्रत्यक्ष पटवीत आहे. अर्थात 'तुकाराम' झाला व होत आहे, या दृष्टीनें तो काल वगळल्यास, ज्ञानदेव–नामदेवाचा कालखंड मला नाट्यविषयाला आकर्षक वाटला आणि म्हणून तोंच पसंत करून आज हें **पंढरपूर** नाटक मी महाराष्ट्रीय रसिक प्रेक्षकांसमोर ठेवीत आहें.

श्रीज्ञानदेव, नामदेव, गोरोबा कुंभार हे सर्व समकालीन संत होऊन गेले. त्यांत वारकरी सांप्रदायाचा आद्य प्रवर्तक कोण या वादग्रस्त प्रश्नांत न शिरतां मला इतकेंच म्हणतां येईल कीं, पंढरपूराचें आणि पंढरीच्या पांडुरंगाचें महात्म्य वाढविण्याच्या कामीं नामदेवाची कामगिरी बिनमोल आहे. ही गोष्ट 'यानें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें' या मोरोपंताच्या प्रसिद्ध आर्यार्धानें सिद्ध होत आहे. "घालीन लोटांगण—" हा नामदेवाचा अभंग म्हटला गेल्याविना आजतागायत कोणताही देवकार्योत्सव पुरा होत नाही, ही एकच वास्तव स्थिती काय दर्शविते ? तरीपण वारकरी पंथाचा मुख्य प्रमाणग्रंथ श्रीज्ञानेश्वरी आहे असेंच मी मानतों—अर्थात भागवत पंथांत वारकरी संप्रदायाचा प्रमाण ग्रंथ व मराठी भाषेचा आद्य ग्रंथ श्रीज्ञानदेवी वयाच्या अवघ्या अठराव्या वर्षी लिहिणारे ज्ञानेश्वर यांची थोरवी अपूर्व नव्हे असें कोण म्हणेल ? या नाटकांत जनाबाईला उद्देशून स्वतः पांडुरंगानेंच म्हटल्याप्रमाणें 'पांडुरंगाचा जो तो भक्त आपापल्यापरी श्रेष्ठच आहे,' आणि हीच समदृष्टि आणि आदरबुद्धि ठेवून या दोन्ही समकालीन

श्रेष्ठ संताचें शब्दचित्र यथामति व यथाशक्ति चित्रित करण्याचा अल्पसा प्रयत्न या नाटकात मी केला आहे. तो कितपत साधला आहे, हें पहाण्याचें काम मी रसिक वाचकांवर सोंपवितो.

नाटकाचें मुख्य कथानक मी दोन कथांवर उभारलं आहे. सर्व संत मंडळींत गोरोबा कुंभारांनीं हातीं थापटणें घेऊन नामदेवाला कच्चें मडकें म्हटलें अशी एक कथा प्रसिद्धच आहे. कार्यकारणभावाच्या दृष्टीनें या कथेवर विचार करीत असतां महीपतीकृत संतलीलामृताच्या २९ व्या अध्यायांतील पंढरपुरांतील कमळाकर ब्राह्मण व त्याची पत्नी सुमती याच्या मुलाच्या मृत्यूची कथा माझे वाचनात आली. आणि मग नाट्यविषयक योग्य ते फेरफार करून व कार्यकारण-भावाच्या दृष्टीनें या दोन्ही कथांची गुंफण करून या नाटकाच्या मुख्य कथानकाचें सूत्र जमविलें आहे.

कथावाङ्मयांत नाटक हें दृश्यकाव्य मानलें जातें. किंबहुना जें नाटक रंग-भूमीवर दृश्य स्वरुपात येऊं शकत नाही अगर येत नाहीं तें खऱ्या अर्थानें नाटक या संज्ञेस पात्रच ठरूं शकत नाहीं, असें मी मानतों. अर्थात नाटक हें नाटककार व नाटक मंडळी याच्या उभयान्वयी प्रयत्नाचें दृश्य फल होय. अशा वेळीं प्रामुख्येंकरून एक गोष्ट मला सहृदय वाचकासमोर मांडावयाची आहे ती ही कीं, ज्याप्रमाणें नाटककाराला कला व साहित्य दृष्टिआड करून चालणार नाहीं, त्याचप्रमाणें नाटक मंडळीला धंदा व लोकाभिरुची नजरेआड करून भागणार नाहीं. आणि याच वस्तुस्थितींत सांप्रत मराठी रंगभूमीवर नाटकाच्या विनोदी उपकथानकाचा जन्म आहे.

**पंढरपूर** नाटकात याच दृष्टीनें नामधारी बडवे बहिरंभट व तातरंभट या भूमीकांच्या चंद्रभागेच्या वाळवंटावरील वारकरी-वृत्तीच्या प्रश्नावर व भोगिराज ब्रह्मघोटाळे या काल्पनिक महंताच्या मठातील कन्या अर्पण करण्याच्या प्रश्नावर, उपकथानकांची उभारणी आहे.

या उपकथानकांतील महंताच्या काल्पनिक भूमिकेसंबंधीं एक खुलासा करणें प्राप्त आहे. "सोनें-नाणें आम्हा मृत्तिकेसमान" किंवा "परनारी आम्हां

रखुमाईसमान " असें मानणारे तेच खरे संत, हीच संतांची व्याख्या पूर्वापार या महाराष्ट्राला परिचित आहे. अर्थात याच्या उलट कामिनी–कांचनाच्या अभिलाषानें मठस्थापना करून महंतगिरी मिरवणारे ते वेगडी भोंदु संत ! आणि ते जसे आजही दिसतात, तसे त्या काळींही होते यात शंका नाहीं. मात्र ज्ञानदेव नामदेव तुकारामादि संत आज संतनाममालिकेंत अजरामर होऊन राहिले आहेत. आणि सालोमालोच्या जातीचे ते तसले संत "**इतिहास जमा**" झाले आहेत. अशाच एका काल्पनिक नकली महंताचें शब्दचित्र, "**हीनें दाविलें चांगले**' या न्यायानें नामदेवासारख्या संताचें खरें महत्व पटावें, एवढ्याच दृष्टीनें, मुख्य कथानकाला पार्श्वभूमी म्हणून, विनोदी उपकथानकांत चित्रित केलें आहे. यात कुणाही विद्यमान संत–महंताचा उपहास करावा, हा माझा हेतू नाहीं. या नाटकांतील ब्रह्मघोटाळे भोगीराज महंत स्वामींच्या स्वभाव चित्रणाशीं क्वचित् कुठें कुणाला स्वभावसाम्य आढळलेंच, तर तो दोष वास्तवतेचा—अर्थात्, विविध कालखंडांतील मानवी स्वभावसाधर्म्याचा आहे, माझा नाहीं ! इतकेंच लिहिलें असतां पुरे आहे.

या काल्पनिक महंताच्या मठातील कन्या अर्पण करण्याच्या उपकथानकातील हीं चित्रें रेखाटण्यात अतिरंजन न व्हावें, अशी शक्य ती काळजी मी घेतली आहे. पण उपरिनिर्दिष्ट धंद्याची वा लोकाभिरुचीची दृष्टि जमेस धरून उणें अधिक दोषस्थल क्वचित् कुठें कुणा सहृदय वाचकास आढळलेंच तर ते क्षमा करतील, अशी आशा आहे.

माझें पहिलें नाटक "**लोकशासन**" मी सुप्रसिद्ध नाटकावर श्री. अप्पासाहेब टिपणीस याच्या **आर्यवर्त नाटक मंडळी** साठीं लिहिलें, आणि तें त्याच कंपनीकडून ता. ६-४-१९१८ रोजीं **बॉम्बे थिएटरांत** रंगभूमीवर आलें. तद्-नंतर ज्या नाटकानें मला लौकिक नि पैसाही दिला तें **रक्षाबंधन** नाटक ता. १६ -१०-२० रोजीं पुणे येथें **किर्लोस्कर थिएटरांत** व **जुगारी जग** नाटक ता. २६-५-२१ रोजीं **बॉम्बे थिएटरांत** अशीं हीं दोन नाटकें लागोपाठ श्रीयुत पोतनीस-टीपणीस यांच्या **गणेश नाटक मंडळीनें** रंगभूमीवर आणलीं. पुढें ता. २६-४-२४ रोजीं माझें **संगीत रामरहीम** नाटक एल्फिन्स्टन थिएटरात

रंगभूमीवर आल्यानंतर सन १९३६ मध्यें **देशबंधु संगीत मंडळीसाठीं नादी नारद** या नावाची एक संगीत विनोदी नाटिका लिहीपर्यंत, दरम्यानच्या काळांत माझ्या नाट्य-लेखनांत कांहीं काळ खंड पडला.

याला इतर अनेक कारणें होतींच. पण त्यांतही प्रमुख कारण म्हणजे धंदा नि कला या दृष्टीनें नाट्यसंस्थेचा पडता काळ हेंच होय ! नाट्य निर्मितीलाही अर्थ शास्त्राचा मागणी आणि पुरवठा हें तत्व लागू पडतेंच. मूक चित्रपट आणि बोलपट यांचा काळ सुरू झाल्यानंतर, मोटारीनें ज्याप्रमाणें खटारे गडगडले त्याच न्यायानें, अव्वलदर्जाच्या नाटक मंडळयाही देखता डोळा नामशेष होण्याचा प्रसंग आला, तेथें जीवन कलहात दुय्यम दर्जाच्या कंपन्याच्या अस्तित्वाचा प्रश्न कुठें राहिला !

धंद्यानिमित्त रत्नागिरी येथें स्थलांतर केल्यावर पुढें नाटक लिहावयाचें नाहीं हाच निर्धार करून बसलों असता पुढें सन १९३६ सालात **नादी नारद** आणि नंतर सन १९३७ सालात हें **पंढरपूर** नाटक लिहावें लागलें.

सन १९३७ च्या पावसाळ्यांत **देशबंधु संगीत मंडळी**चा मुक्काम रत्नागिरी येथें होता. नव्या नाटकाच्या अभावीं त्याचा मुक्काम पडूं नये, या दृष्टीनें केवळ त्यांच्या धंद्याला हातभार लावावा यच्च हेतूनें, **देशबंधु संगीत मंडळी**च्या मालकांच्या विनंतीवरून त्याचे नाट्यसंस्थेसाठीं मी हें नाटक अल्पावधींत लिहून दिलें ! या नाटकाचा प्रथम प्रयोग याच रत्नागिरी शहरांत येथील दामोदर चित्रपट भुवनांत सोमवार ता. १९-७-३७ रोजीं आषाढी एकादशीच्या सुमुहूर्तावर येथील प्रसिद्ध वकील नि प्रमुख नागरीक रावबहादूर **बाबासाहेब परुळेकर** यांचे अध्यक्षतेखालीं साजरा झाला.

नाटकाची यशस्विता नाट्यग्रंथाच्या गुणावर तशीच ती प्रयोगाच्या कृतीवरही अवलंबून असते ! पंढरपूर नाटकाच्या गुणावगुणाबद्दल मी काय लिहिणार ? त्यावर निर्णीत मत देणें सहृदय वाचकाचें अगर प्रेक्षकाचें काम आहे. दोष दिसला तर तो माझा आहे. गुणाचा अंश आढळल्यास तो पांडुरंगाचा प्रसाद आहे ! तरीपण या ठिकाणीं मी इतकेंच लिहूं इच्छितों कीं साहित्यिक गुणाव-

गुणाचा प्रश्न सोडून दिला तरी ज्या मूळ हेतूनें मी हें नाटक लिहिलें तो हेतु सफल झाला आहे, व होत आहे. आणि तेवढ्यापुरतें तरीं या नाटकानें यश संपादन केलें आहे, अशी ही या नाट्यनिर्मितीची व यशस्वितेची वास्तव स्थिति आहे!

नाटक रंगभूमीवर येऊन जवळ जवळ तीन वर्षे लोटत आलीं, तरी पुस्तक प्रकाशनाचें काम दिरंगाईवर पडून राहिलें होतें. तो योग आजच्या रत्नागिरी येथील साहित्य संमेलनाच्या निमित्तानें जुळून आला. साहित्य संमेलनात अध्यक्षाना ग्रंथार्पण करण्याचा एक कार्यक्रम ठेवण्यात येत असतो. बाहेरील मोठमोठ्या विद्वानांचे मोठमोठे ग्रंथ अर्पण होतीलच, पण ज्या रत्नागिरी शहरात हें संमेलन भरत आहे, तेथील एका स्थानिक लेखकाची एकादी अत्यल्प कृति अध्यक्षाना अर्पण होण्यांत औचित्य आहे, या कल्पनेंतच छपाईच्या आजच्या महर्गतेच्या काळातही या पुस्तकाचें आज हें प्रकाशन होण्याचा हा योग जुळून येत आहे.

या नाटकाची हस्तलिखित प्रत तालमींत घेण्यापूर्वी माझे स्नेही बलवंत कर्ते श्री. **मोरोपंत जोशी** वकील यांस व माझे बंधु श्री. **श्रीराम गोविंद शेट्ये** चीफ ऑफीसर रत्नागिरी म्युनिसीपलिटी व श्री. **दादासाहेब घोगले,** यास वाचून दाखविली व त्यानीं या कामीं प्रोत्साहन दिलें याबद्दल मी त्याचा आभारी आहें.

त्याचप्रमाणें छपाईचें व प्रकाशनाचें काम जबाबदारीनें स्विकारून हें पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल माझे स्नेही श्री. **दादासाहेब घोगले** व श्री. **एकनाथ सखाराम पाथरे** याचे व त्याना त्याच्या अडचणीचे वेळीं आपुलकीनें सहाय्य केल्याबद्दल सुप्रसिद्ध कॉन्ट्रॅक्टर श्री. **शंकर बापूजी जोशी** त्याचप्रमाणें हें पुस्तक अल्पावधींत सुंदर छापून दिल्याबद्दल बॉम्बे सेंट्रल प्रेसचे मालक श्री. **पी. जे. देसाई,** व कव्हरवरील फोटो तयार करण्याबाबत सुप्रसिद्ध रेडियो स्टार सौ. **विमल घैसास** यानीं सुंदर पोझ देऊन श्री. **जयंत एम्. शेडगे** (आर्टिस्ट, टाइम्स ऑफ इंडिया) यानीं डिझाइन करून दिल्याबद्दल मेसर्स **प्रभात फोटो स्टुडियो** (लालबाग) यांचा मी अत्यंत आभारी आहें.

या भजनावलीतील अभंग ज्ञानदेव, नामदेव, जनाबाई व गोराकुंभार यांचे मूळ अस्सल घेतलेले आहेत. सांप्रदायिक वाङ्मयीन वारसा हक्कानें कुणाचाही

त्यावर हक्क आहे व तो तसा माझाही आहे, हें मताच्या पायीं विनम्र होऊन मी कृतज्ञतेनं जाहीर करतो. नमनाचें १ हें भजन सौ. **सुभद्रा विश्वनाथ शेट्ये** यांचें व अंक ३ मधील भावगीत त्यांच्या कोल्हापूर येथील एका भगिनीचें त्यांनीं नाटकात घालण्यास दिलें याबद्दल त्यांचे आभार—पण ते मला कसे मानता येतील? अस्तु. शेवटीं श्री ज्ञानदेवाच्या

**भरोनी सद्भावाची अंजुळी।**
**मियां वोविया फुलें मोकळीं।**
**अर्पिली अंघ्रियुगुलीं।**
**विश्वरूपाचा !**

या शब्दात हें हृद्गत पुरें करतो.

**रत्नागिरी**
ता. ४।५।४०

सर्वांचा नम्र

॥ श्री ॥

# पंढरपूर

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—पंढरपूर. विठोबाचें देऊळ. राऊळातील गाभारा; आत विठोबाची मूर्ती. कठड्याच्या आत सिंहासनाच्या पायरीवर डोकें ठेवून ध्यानस्थ **नामदेव.** कठड्याबाहेर हातीं टाळ घेऊन भजन करीत **जनाबाई.**

दिवस—आषाढ शु॥ १०. वेळ—मध्यरात्र. ]

जनाबाई—

**पांडुरंग श्रीहरी। कृपा करि। पांडुरंग श्रीहरी ॥ धृ० ॥**
**रूप तुझें तें। नयनीं पहातां। तृप्ति होय अंतरीं ॥ १ ॥**
**किरिट कुंडलें। तुलसी-माला। मूर्ति दिसे गोजिरी ॥ २ ॥**
**कांसे कसिला। पीत पितांबर। कटीं मेखला वरी ॥ ३ ॥**
**तव पद-कमलीं। विनति जनीची। मम जीवा उद्धरी ॥ ४ ॥**

विठाई माऊली, तू या जनाबाईलाच नव्हे, तर साऱ्या जगाला कृपेची साऊली आहेस. कृष्णावतारीं पांचाळीला वस्त्रें पुरवून तिची लाज राखलीस. रामावतारी

रावणासारखा बलाढ्य दैत्य मारून बिभीषणाला राज्य दिलंस, युगायुगाचे ठायीं नाना अवतार घेऊन, नि नाना लीला करून, तूं आपलं भक्तवात्सल्य प्रगट केलंस; नि आज या कलियुगात, या पंढरपुरात, भीमेच्या या वाळवंटात, मातापित्याची एकनिष्ठ सेवा करणाऱ्या भगवद्भक्त पुंडलीकास साक्षाद्दर्शन देण्यासाठीं प्रगट आलास ! नि त्याचवेळीं पाडुरंगा, तुझ्या सन्मानार्थ पुंडलीकानें फेंकलेल्या विटेवर, देवा, तूं—

**पाय जोडुनि वीटेवरी । कर ठेवुनि कटीवरी ॥ धृ० ॥**
**रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडलें मकराकार ॥ १ ॥**
**गळां वैजयंती माळा । तो हा मदनाचा पूतळा ॥ २ ॥**
**गरुड सन्मुखीं ऊभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ३ ॥**

पाडुरंगा, पुंडलीकाकारणें युगें अठ्ठावीस कटीवरी हात विटेवरी उभा, असा तू या दासी जनीच्या हातून घडत असलेल्या तुझ्या भक्ताच्या, नामदेवाच्या सेवेनेंच संतुष्ट होतोस, या जनीला सगुण दर्शनाचा लाभ देतोस हें मी जाणतें. पाडुरंगा, ‘वऱ्हाडीया सोहळा नोवरीया संगें । तया मांडे पुरणपोळ्या अन्न मिळे । परिसाचे निसंगें लोहो सोनें होय, तयाचीं भूषणें श्रीमंतासी. जनी म्हणे नामयाची दासी म्हणोनिया तिला विठोबाची जोड झाली ! भक्तसख्या पंढरीराया, नामदेवा कारणें का होइना पण या दासी जनीसाठीं तूं इतका शिणतोस, अशी या दासीनं पुण्याई तरी काय केली होती ? पक्षीण जशी पिलाकरता चारा घेऊन धावून येत, तद्वत् या पापी जनीसाठीं धावत येऊन तूं नाहीं नाहीं ती कामें करतोस; देवा, या जनीसाठीं दळणकाडण करीत असता, कमलाहूनही कोमल अशा तुझ्या हाताना कळा नाहीं का लागत ? हाती केरसुणी घेऊन डोईवर केराच्या पाट्या वहाताना, तुझं डोकं नाही का दुखत ? मी न्हाऊं लागलें कीं माझं अंग भाजूं नये, म्हणून पाण्यांत विसण घालतोस, नि मी निजलें असता, थंडीवाऱ्यानें काकडूं नये म्हणून माझे अंगावर हळूच कांबळ टाकतोस, या गोष्टींनीं देवा, तुला कष्ट नाही का होत ! पाडुरंगा, जनीच्या हाकेला धावून आला नाहींस, असं आजवर घडलं

नाहीं. मग आजच असं का व्हावं ? आज आषाढ शुद्ध दशमी. उद्या आषाढी एकादशी; या पंढरीच्या महोत्सवाचा मंगल दिन ! या आनंदाच्या दिवशीं, आपल्या भक्ताना संकटात टाकणं, देवा, तुझं ब्रीद का ? आजचा सारा दिवस गेला. नामदेव एकाकी घरून नाहीसे झाले, त्याचा पत्ता नाही. म्हणून देवा तुझा धावा केला पण तुझाही ना ठावठिकाण. म्हणूनच देवा, अशा या मध्यरात्रीच्या वेळी, या राऊळात तुझ्या दारी धाव घेतली. आता तरी पंढरीराया—

**किती तुला आतां येऊं काकुळती ?**
**धांवरे श्रीपती भेटी येई ॥ धृ० ॥**
**केली कां रे सांडी माझी हृषीकेषी ।**
**आम्ही कोणापाशीं तोंड वासूं ॥ १ ॥**
**नको अंत पाहूं, पांडुरंगे आई ।**
**जनी विठोपायीं मिठी घाली ॥ २ ॥**

[ ‘ विठाई माऊली ग माय माझे विठाई माऊली ’ असें भजन. राऊळातील विठोबाची मूर्ती अदृश्य होऊन साक्षात् पांडुरंग प्रगट होतात. ]

**पांडुरंग**—जने, मध्यरात्रीं, या अवेळीं का आलीस ?

**जनाबाई**—देवा, नामदेव कुठं आहे ?

**पांडुरंग**—जिथं मी तिथं नामदेव.

**जनाबाई**—देवा, एक दिवस झाला. नामदेवाचा ठावठिकाणा नाहीं. घरीं आई गोणाई, वहिनी राजाई, आणि मुलं नारा, गोंदा, म्हादा नि विठा यानी रडून आकांत मांडलाय. शेवटी तुझा धावा केला. पण तुझाही पत्ता नाहीं. होतास कुठं देवा ?

**पांडुरंग**—ज्याच्या मुखी सदा देवाचं नाव, असा नामदेव जिथं तिथं मीही. जने, आज सारा दिवस नामदेवानं राऊळात माझे पायी धरणं धरलं, माझे पायच सोडीना.

**जनाबाई**— आणि ते का ?

**पांडुरंग**—आठवत नाही ? एक वर्ष झालं. गेल्या आषाढी द्वादशीचीच गोष्ट ती. याच पंढरपुरात, चंद्रभागेच्या वाळवटावर, निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चोखा मेळा, सावतामाळी, गोरा कुंभार, नामदेव व इतर भक्तमंडळ जमलं होत.

**जनाबाई**—हा हा, आता आठवल. त्यावेळीं नामदेवासंगती मीही तिथ होतें—त्यावेळीं ज्ञानदेव गोरोबास म्हणाले, "काका, या सर्व भाड्यात पक्की कोणतीं नि कच्ची कोणती हें ओळखा पाहूं." त्यानतर आपलं कुंभाराचं थापटण प्रत्येकाच्या माथी मारीत शेवटी तें नामदेवापाशीं आलं व थापटल्यावर नामदेवाकडे बोट दाखवून काका म्हणाले, "हा एवढा घट मात्र कच्चा दिसतोय." आत्ता आठवल—

**पांडुरंग**—आठवलं ना ? मग त्याच वेळीं नामा मजपाशीं येऊन त्यान गोरोबाच्या निर्णयाबद्दल मला सवाल टाकला नि मीही त्याला त्याच उत्तर द्यायला एक वर्षाचा अवधी मागून घेतला. त्या गोष्टीला वर्ष होत आल नि म्हणूनच नामा पुन्हा राऊळात येऊन गोरोबाच्या त्या निर्णयाचं मर्म जाणण्यासाटी सारा दिवसभर माझ्या पायीं धरणं धरून बसला—

**जना०**—मग आता नामदेव कुठं आहे ?

**पांडुरंग**—तो पहा, कठड्याच्या आत सिंहासनाच्या पायरीवर भक्तीच्या एकतानतेंत समाधीसुखाचा अनुभव घेत पडला आहे बोलाव त्याला ?

नामदेव—नामदेव, ( टाळी वाजवतो. नामदेव जागा होतो. )

**नामदेव**—पांडुरंग—पांडुरंग—! ( पुढे येऊन ) पंढरीराया—

**माझी कोण गती सांगा पंढरीनाथा ।**
**तारिसी अनाथा केव्हां मज ॥ ध्रु० ॥**
**मना पासोनीयां सांग मजप्रती ।**
**पुसे काकुळती जीवीचिया ॥ १ ॥**
**न बोलसी कां रे धरिला अबोला ।**
**कोणासी विठ्ठला शरण जाऊं ? ॥ २ ॥**
**नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा ।**
**कृपाळु बा कांता रखुमाईच्या ॥ ३ ॥**

**जना०**—मग रखुमाईवल्लभा पाडुरंगा, आता माझ्या नामदेवाचा तूं अंत तरी किती पहाणार ? सागना त्याच्या सवालाच उत्तर.

**पांडुरंग**—जने, याच आषाढी एकादशीच्या महोत्सवात, याच पंढरपुरात, अशीच काही घटना घडून येईल कीं त्या योगं द्वादशीस उपवासाचं पारणं फिटायचेवेळीं, त्याच संत मंडळीच्या मेळाव्यात, त्याच ज्ञानदेवासमक्ष, त्याच गोरोबासमक्ष, तुझ्याच मुखातून गोरोबाच्या निर्णयाचं मर्म नामदेवाला ऐकायला मिळेल, असाच चमत्कार घडून येईल.

**जना०**—देवा, तुझ्या राज्यात साराच काही चमत्कार ! गोदातटाकी, पैठण क्षेत्रीं, आपल्या भक्तासाठी, आळंदीच्या ज्ञानदेवासाठी, रेड्यामुखी वेद वदवलेस. तर मग देवा, माझ्यासारख्या एका दासीच्या मुखी, हें मर्म वदवायचा चमत्कार तूं का नाहीं करून दाखविणार ? पण देवा, साऱ्या चमत्कारात मोठाच चमत्कार म्हणजे गोरोबाकाकांनी नामदेवाला कच्चं मडकं म्हणताच, मुक्ताबाई हंसली तर हंसली–बोलून चालून अल्पवयी पोरच ती. पण थोरातले थोर, साक्षात् शिव विष्णू ब्रह्म अशी ज्याची ख्याती, असे तुझे महान् महान् भक्त निवृत्तीदेव, सोपानदेव हेही हसले ! पाडुरगा, तुझा ज्ञानी भक्त तो ज्ञानदेव, तोही हंसला बर !

**पांडुरंग**—जने, तरी पण ज्ञानदेवाची थोरवी फार मोटी आहे.

**जना०**—आणि माझ्या नामदेवाची ?

**पांडुरंग**—कमी आहे असं का मी म्हणालों ? जो तो भक्त आपापल्यापरी थोरच आहे.

**नाम०**—खरं आहे देवा. जने तूं चुकतें आहेस. निवृत्तीदेव, ज्ञानदेव, सोपानदेव या तिन्ही देवाची थोरवी अंगी यायला मोठेंच सुकृत लागतं—

**तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रगटले ॥ १ ॥**
**धन्य तो निवृत्ती, धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ २ ॥**
**उपजतां ज्ञानी वर्म हें जाणोनी । आले लोटांगणीं चांगदेव ॥ ३ ॥**
**प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । रेड्यामुखें वेद बोलवीले ॥ ४ ॥**

**सोहं सुकृताच्या सोडोनीया गांठी । केलीसे मऱ्हाठी गीतादेवी ॥५॥**
**नामा म्हणे सर्व सुकृत लाहीजे । एक वेळ जाईजे अलंकापुरा ॥ ६ ॥**

जने, गोरोबानी मला कच्चं मडकं म्हटलं, ज्ञानदेव अगर इतर संत मला हसले, या गोष्टीचं किल्मीष माझ्या मनीं नाहीं त्यायोगें त्यांच्याबद्दल माझ्या ठायीं अनादर नाही; अगर त्याचा निवाडा घेण्यासाठी मी देवादारीं आलों, असेही नाहीं. तर त्यांच्यासारख्या आत्मप्रतीती झालेल्या भगद्भक्तांनीं असं का म्हणावं, अगर असं का करावं, या आत्मसंशोधनाच्या बुद्धीनंच मी देवादारीं ठाण मांडून बसलों आहे.

**पांडुरंग**—जने, पाहिलीस, हीच माझ्या नामदेवाची योग्यता. हीच त्याची थोरवी. नामदेवा, आत्मसंशोधनाच्या दृष्टीनंच तुला हें कोडं उलगडून घ्यायचं असेल तर प्रथम मी सांगतों तसं कर. ज्ञानदेवानं नेवासें येथें लिहून पुरी केलेली आपली ज्ञानेश्वरीची पोथी तो पालखींत घालून उद्यां पंढरपुरीं पांडुरंगार्पण करण्यासाठी घेऊन येत आहे. त्या ज्ञानदेवाला कडकडून भेट नि त्याच्या ज्ञानदेवीसारख्या पवित्र ग्रंथाचं चंद्रभागेच्या वाळवंटावर वंदन नि पूजन करून पवित्र हो. आत्मप्रतीतीची पूर्व तयारी म्हणून एवढी गोष्ट केलीस म्हणजे याच पंढरपुरीं पुढं अशी एक घटना घडून येईल कीं त्यायोगें तुझ्या मनातलं कोडं आपोआप तुलाच उलगडेल. [ राऊळांत नौबत घंटा ] ही पहा राऊळांत नौबत घंटा वाजूं लागली. इथं आतां गर्दी होईल. मी येतों. [ पांडुरंग अदृश्य. मूर्ती पूर्ववत होते. ]

**जना०**—म्हणजे, काय बाई याचा अर्थ ?

**नाम०**—याचा अर्थ एकच. भगवद्भजन. जने, पांडुरंगाच्या गूढ वाणीचा अर्थ उलगडेनासा झाला, कीं पुढं एकच साधन. पांडुरंगाचं नामस्मरण–पांडुरंगाचं भजन. [ विटेवरी उभा कटेवरी हात । काय मौजेचा पंढरीनाथ ॥ हें भजन करीत जातो. ]

**जना०**—अहाहा, माझा नामदेव, पांडुरंगाचा केवढा थोर भक्त. नामदेवा, माझा जन्म गोदातीरीं, गंगाखेड गावांत एका शूद्र घराण्यांत. माझा पिता दमा

नि आई करुंद याना बालवयातच सोडून, तुझ्या दारी दासी म्हणून आले ती तुझ्यासारख्या भक्ताची या जन्मीं सेवा व्हावी म्हणून ना ? कृतयुगातली पद्मिनी, त्रेतायुगातली मथरा, नि द्वापारयुगातली कुब्जा तीच ना मी ही कलीयुगातली नामदेवाची जनी ?

**जनक जननि त्यजुनि आलें । आलें पदिं नामदेवा ॥ धृ० ॥**

**दीन दासि । शरण तुला । जनिला या । तारा ॥ १ ॥**

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—पंढरपूर. आषाढी एकादशी. सकाळ. वारकरी व त्याची बायको. ]

**वारकरी** "विठ्ठलाचा गजर हरिनामाचा । पंढरीरायाचा !"

[एका बाजूनं बहिरंभट व दुसऱ्या बाजूनें तोतरंभट वडवे, हातीं वह्या घेऊन येतात.]

**बहिरंभट**—तेरं वितर सरक भयो.

**तोतरंभट**—स-स-सरक भयो.

**बहिरं०**—का ? यजमान, कोण गाव ?

**तोतरं०**—कोण धाम ?

**बहिरं०**—काय नाव ?

**तोतरं०**—काय काम ?

**बहिरं०**—कोठून आलात ?

**तोतरं०**—कुठं जाणार ?

**बहिरं०**—कुटुंबातलं पूर्वी कोण कोण आलं होत ?

**तोतरं०**—निदान कुटुंब तरी ?

**बहिरं०**—बोला, बाप-आजा-पणजा-निपणजा -खापरपणजा ?

**तोतरं०**—आई-आजी-पणजी--खापरपणजी ?

**बहिरं०**—गावचा कोणी ?

**तोतरं०**—निदान शेजारीपाजारी ?

**बहिरं०**—शेजारच्या गावचा तुमचा हात धरून ?

**तोतरं०**—निदान तुमची बायको शेजाऱ्याचा हात धरून ?

**वारकरी**—कोण शिची ब्याद या बडव्याची ? टोळधाडच नव्ह का ? घरचे, चल धर्मशाळा गाठूं, नव्ह का ? [ 'विठूचा' इत्यादि पूर्वोक्त भजन ]

**बहिरं०**—अहो यजमान, थांबा कीं-चाललात कुठं ?

**वार०**—कोण रे बाबानो तुम्ही ?

**बहिरं०**—ऑ ! आम्ही होय ! या क्षेत्रातले उपाध्ये. या पंढरपूरचे बडवे.

**तोतरं०**—कसले बडवे ? खरे बडवे बिचारे देवळात देवकार्य करताहेत. आम्हीं बडव्याची सोंगं घेतलेले पोटभरू बडवे—

**बहिरं०**—यांचं नाव तोतरंभट. जरा तोतरे आहेत. मधून मधून जरा जीभ अडते. नि माझं नाव बहिरंभट—

**तोतरं०**—जरा बहिरे आहेत. मधून मधून जरा कान अडतो.

**बहिरं०**—होय हो. पण तुम्हीं असं अडून कसं चालेल ? बोला ना. कुठून आलात ?

**तोतरं०**—कुणाच्या घरीं जाणार ?

**बहिरं०**—काय काय तीर्थं करणार ?

**तोतरं०**—काय काय कारुकं करणार ?

**बहिरं०**—दानं काय काय करणार ?

**तोतरं०**—दक्षिणा काय देणार ?

**वार०**—बाबानो, मी आलों आहें पंढरीच्या वारीला, नव्ह का ? मग देवाचं नाव आधीं घेऊं द्या. [ 'विठूचा गजर' वगैरे पूर्वोक्त म्हणतो. ]

**बहिरं०**—आ ! काय म्हणालात ? तुमचं नाव विठू, आणि याचं गजरा. आहेत-आहेत-हींच नावें या चोपडींत आहेत. खास तुम्हीं माझेच यजमान—

**वार०**—यजमान गेले मसणात. चला व्हा दूर—

**तोतरं०**—सरक् भयो. हे माझेच यजमान. ही पहा-हींच नावं आहेत या चोपडींत.

**वार०**—कशी असतील ? आमचे उपाध्ये-या पंढरीचे-ते उपटंभट नव्ह का !

**बहिरं०**—अरे तोतरंभट, हा कुठला कोण मध्येंच उपटला उपटंभट ?

**तोतरं०** —तोर—लुडबुडे स्वामींच्या मठातला—

**बहिरं०**—अरे उपटसुंभ्या उपटंभटा. माझं गिऱ्हाईक मध्येंच उपटणार होय.

**तोतरं०**—अहो यजमान, तो उपटंभट जीता नाही—

**बहिरं०**—तो मेला. पटकी आली त्याच्यावर. खोटं नाहीं. अहो गेल्या आषाढीला तो पटकीनं आटपला; सारं फिटंफाट. मग आतां बोला. कुठं उतरणार ? या चोपडींत ?

**तोतरं०**—सरक् भयो. बोला यजमान या चोपडींत ?

**बहिरं०**—बोला काय काय कारुकं करणार ?

**वार०**—पहिलं. हें पाहिलंस-जूतें दान करणार नव्ह का ?

**बहिरं०**—काय म्हणालात ? गोप्रदान ? ठीक. मग करूं-तेंच करूं. ब्राम्हणाला गाय द्या नि ब्राम्हणीला सूप-वाण द्या.

**वार०**—चागलं पायताण देतों; आणि घेतों नीट समाचार नव्ह का ?

**बहिरं०**—काय म्हणालात ? उपचार ? देवाचे होय ? ठीक. मग तेही दाखवूं. प्रदक्षिणा घालवूं.

**तोतरं०**—दाक्षिणा घेऊं.

**वार०**—म्हणजे आम्हा वारकऱ्यांना लुटूं, नव्ह का ?

**बहिरं०**—छे छे छ छे. तुमच्या जवळचे पैसे सरले तर तुमच्या आगाखांद्यावरचे दागिने आमच्याकडे गहाण ठेवा. तारणावर कर्ज देऊं. पण तुम्हांला ब्राम्हण-सहस्रभोजनाचा पुण्यलाभ घडवूं.

**वार०**—वाहवा, पंढरीच्या पेढीवर चांगलाच व्यापार चालला आहे नव्ह का !

**तोतरं०**—अहो, तुम्हांला मोक्ष नको का मिळायला !

**वार०**—अहांत खरे बाबानों, तुम्हीं पांडुरंगाच्या द्वारी मोक्षाचे खरे घाटाडे. वारकरी तावडींत सांपडला कीं अखेर त्याची मोक्षगाठ नव्ह का ! चला-व्हा दूर.

**तोतरं**०—चल हो दूर. सरक् भयां. यजमान चला माझ्यासंगती

**वार**०—चला व्हा दूर म्हणतों ना ?

**बहिरं**०—अरे हे तुला सागताहेत. तेरे पितर सरक् भयां. यजमान, चला तुम्हीं माझ्यासंगतीं—

**तोतरं**०—छेः माझ्या संगतीं—

**बहिरं**०—छेः माझ्या संगती. [ झोंबाझोंबी करतात. ]

**वार**०—अरे बाबानों, का करता असा छळ माझा ? सोडा ना माझी वाट.

**बहिरं**०—सोडली. चला तुम्ही एकटे पापाच्या या वाटेन, आणि सोडा या बाईला क्षेत्रांतल्या पुण्याच्या वाटेन. आम्हाला तिचं तरी मिळूंदे यजमानपण—

**वार**०—पाडुरंग पाडुरंग. घरचं, चल—

**तोतरं**०—घरची ! म्हणजे ? बाहेरची आणखी दुसरी आहे कीं काय ?

**वार**०—पंढरीराया, तुझ्या नावानं पंढरीस धाव घेणाऱ्या तुझ्या बारकऱ्याची या पंढरपुरात काय ही विटंबना ?

**बहिरं**०—नाहीं—म्हणजे तसं असल तर एक परी ठीकच. अनायास याच्या माझ्यांतला तंटा तरी मिटेल. घरची द्या मला आणि बाहेरची द्या याला.

**वार**०—पापिष्टानों, पंढरपुरच्या या पुण्यनगरींत, पाडुरंगाच्या राऊळासमीप कसले पापी शब्द ऐकवता मला ?

**तोतरं**०—म्हणजे, यात कसलं पाप ?

**बहिरं**०—आणि असलंच तर या पंढरपुरात तें घरोघर आहे. घरची नि बाहेरची लागतातच दोन. घरच्या नि बाहेरच्या कामाला. चंद्रभागास्नान, सवाष्णपूजन, रुक्माईओटीभरण, दापत्यमेहुण वगैरे वगैरे बाहेरची कामं, तसंच नैवेद्य, भोजन यजमानांची सेवाचाकरी वगैरे वगैरे घरची कामे—

**तोतरं**०—पण मजा ही की घरची जाते बाहेरच्या कामाला नि बाहेरची लागते घरच्या कामाला.

**बहिरं**०—मग चला मिटवा तंटा. घरची द्या मला नि बाहेरची द्या याला.

**तोतरं०**—बाहेरची मला काय म्हणून ? घरची मला.

**बहिरं०**—का ? त्यातही भांडण.

**तोतरं०**—कां नाहीं होणार ? अहो यांची ही घरची आहे सवाष्णबाई. लेका, तुझी घरची मरून तिचं तेरावेंही झालं नाहीं अजून. मग तिच्या सुतकात तुझ्या घरीं हिचं सवाष्णवाण कोण करील ?

**बहिरं०**—आणि तुझ्यातरी ? उगाच घमेंड कशाला मारतोस ? माझीं यजमानं उपटूं पहातोस होय ? मग फोडूं लेका तुझं बेंड ? तुझा तो गोप्या झालाय् गोपिका—

**तोतरं०**—हं हं हं हं ! चूप.

**बहिरं०**—चूप काय म्हणून ? आता माझ्या वृत्तीवरच बेतली. आता नाहीं चूप.

**तोतरं०**—हात जोडतों.

**बहिरं०**—छेः, होणं नाही.

**तोतरं०**—पाय धरतों [ पाय धरतो ]

**बहिरं०**—छेः बिलकुल नाही.

**तोतरं०**—होय म्हण—

**बहिरं०**—नाही. [ होय नाहीं अशी झोंबाझोंब. इतक्यात वारकरी नि त्याची बायको पाय काढतात; आणि दोघे तोंड वासून उभे रहातात. ] झालं, घालवलंस हातचं गिऱ्हाईक !

**तोतरं०**—कुणी मी ?

**बहिरं०**—नाहीतर कुणी मी ?

**तोतरं०**—तूंच, तूंच नाहीं फोडलंस माझं गुपीत !

**बहिरं०**—मग काय खोटं आहे ! तुझी बायको मेली. घरांत नाही कुणी सवाष्णबाई. लेक आहे गोप्या. त्याला बनवलीस गोपिका. बायको म्हणून पोराला नदीवर नेतोस नि यजमानाना फसवून दक्षिणा लाटतोस.

**तोतरं०**—मग काय करूं रे ? नवी नवरी घरी यईतों काय चातुर्मास्याची वृत्ति बुडवूं ?

**बहिरं०**—होय. मग लोका सागे ब्रम्हज्ञान. लेका. माझ्या बायकोचं चारचौघात सुतक काढूं लागलास तर माझीही नाही वृत्ती बुडायची ?

**तोतरं०**—बुडेल. खरं आहे. पण आता बहिरंभट, गोप्याला गोपिका बनवला तो बायको म्हणून नाही तर मुलगी म्हणून. सौभाग्यवती म्हणून नाही तर सौभाग्य-कांक्षिणी म्हणून. या लुगडं चोळीच खरं कारण—

**बहिरं०**—तें काय बुवा ?

**तोतरं०**—तुला नाही माहिती ? या पंढरपुरात एक मठवासी महंत आहेत.

**बहिरं०**—ते कोण बुवा ?

**तोतरं०**—वेदशास्त्रशून्य, अनंगपोटी, लबाडनायक, ब्रम्हघोटाळे, भोगीराज महंत स्वामी महाराज—

**बहिरं०**—हं. नावातही ब्रम्हघोटाळाच दिसतोय. बाकी—आहेत प्रसिद्धच आहेत ते.

**तोतरं०**—त्याचा आहे मी शिष्य. 'ब्रम्हस्वरुपीण वराय' असं म्हणून महंत स्वामीना मुलगी अर्पण केल्यास आईबापाना मोक्ष मिळतो, असा आहे आमच्या स्वामींचा धर्मशास्त्रसिद्धात. एक दिवस स्वामी मला म्हणाले, "शिष्यवरा वाटेल तेवढं द्रव्य घे पण तुझी कन्या मला अर्पण कर." मी म्हणालों 'बुवा, मला एक पुत्र आहे. कन्या नाही.' त्यावर बुवानी तत्काळ शास्त्राधार काढला. 'पुरुषाना लुगडं नेसवणं, बागड्या भरण, कुंकू लावणं, स्त्रीवेष देणं हें सशास्त्र आहे.'

**बहिरं०**—अस अस. म्हणूनच वाटतं लुगडं कुंकू लावून गोप्याला गोपिका बनवलीस—

**तोतरं०**—पण ते शास्त्राच तत्व पटल म्हणून नव्हे तर बुवाकडून तत्वमसीचं तत्व पटलं म्हणून. अर्पणाविधी होऊन नि आध्यात्मिक लग्न लागून माझा गोप्या कन्याकुमारी सती गोपिकाबाई झाला त्याच दिवशीं रोकड दोन हजार रौप्य मुद्रिका आणि मठाच्या मिळकतीची निम्मी मालकी मिळाली. आहेस कुठ !

**बहिरं०**—अस्मानात उडालों रे बाबा हें ऐकून. काय असेल फायदा नि सुख यात त्या महंताना, तें या पंढरीच्या विठोबाला देखील सांगतां यायचं नाहीं.

**तोतरं०**—पण तें मी सांगतों ना ? फायद्याशिवाय कोण कशाला सौदा करील ? स्वामींना कुणीच कन्या अर्पण करीना; तेव्हां एक दिवस स्वामी मला म्हणाले, तोतरंभट, तूं आहेस घरचा. घरच्या एखाद्यानं असं केलं म्हणजे बाहेरचीं माणसेंही तसंच करतात, आणि मग पडते वहिवाट. तेव्हा ही वहिवाट तूंच पाड; आणि काय सांगूं तुला बहिरंभट, महाराजांचेच शब्द ते. कसे सोळा आणे खरे ठरलं. वहिवाट पडली आणि आज काय ? श्रीमंत आणि धर्मभोळ्या लोकानी अर्पण केलेल्या सुंदर कन्याकुमारी सतींनी आमचा मठ कसा गजबजून गेला आहे. बहिरंभट खरंच सांगतों. कसला तो आळंदीचा ज्ञानदेव आणि पंढरपूरचा नामदेव. आमच्या भोगीराज स्वामींच्यासारखं राजयोगी वैभव भोगायला पदरीं पुण्य लागतं.

**बहिरं०**—नि तुझ्यासारखं तत्वमसीचं वैभव भोगायलाही पुण्य लागतं. पण लेका, या तुझ्या पुण्याचा मला निम्मा वाटेकरी कर. नाहींतर साऱ्या पंढरपुरांत तुझंच बिंग बाहेर फोडतों.

**तोतरं०**—सर्वं नाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः—सोडतों अर्ध्यावर पाणी.

**बहिरं०**—होय ! मग दे हात—

**तोतरं०**—हा घे. [ हातावर हात देतो ] [ स्वगत ] तुरी— [ गोप्या स्त्रीवेषांत धांवत धावत येतो. ]

**गोप्या**—बाबा—बाबा. [ बहिरंभटाला पाहून लाजतो. ]

**बहिरं०**—काय लेकाचा लाजतोय ! ओहो काय नखरा ! काय नखरा ! हा नखरा पाहून वाटतं कीं हा स्त्री काय न खरा ?

**तोतरं०**—बहिरंभट आतां तुम्हीं आम्हीं वाटेली. चला गांठा त्या वारकऱ्याला आणि पटवा सौदा—

**बहिरं०**—[ स्वगत ] अस्सं. मला काढून लावून याचं कांहींतरी खलबत व्हायचं आहेसं दिसतंय; आणि म्हणे वाटेली. [ उघड ] बरं आहे. तोतरंभटा, प—प—पाहून घेईन.

**तोतरं०**—च—चला.

**बहिरं०**—च—च—चाललो. कायरे गोप्या ?

**गोप्या**—इश्श. [ लाजतो ]

**बहिरं०**—अरे लेका—इश्श ? थूः तुझ्या मर्दाईवर. [ जातो. ]

**गोप्या**—बाबा, स्वामी महाराज कुठं आहेत ?

**तोतरं०**—भीमेच्या संगमतीर्थांत अवगाहन नि पार्थिवलिंग पूजा उरकून भीमा-तटाकीं भोगीदास घाटावर ठाण ठोकून बसले आहेत.

**गोप्या**—होय ? पण जिच्या वाटेकडं डोळ लावून स्वामी महाराज बसले आहेत, ती भावी कन्याकुमारी सती आज भोगीदास घाटानं स्नानाला गेली नाही, तर वैराग्य घाटानं ब्रम्हतीर्थांत स्नान उरकून परत याच वाटेनं येत आहे. तव्हा तुम्ही जा नि स्वामींना इकडेच घेऊन या. जा—जा कसे. ही पहा आलीच. काही तरी निमित्त करून मी तिला थोपवून धरतो. चला आलीच ती.

**तोतरं०**—सरक् भयो. ( जातो. )

**गोप्या**—[ टाळ घेऊन भजन. ]

**भाव एक । मी सद्‌गुरूची लेक ॥ धृ० ॥**
**सद्‌गुरु माझा चंद्रमौळी ॥ कांखे देउनियां ही झोळी ॥**
**मज हिंडवि आळोआळी । मागवि भीक ॥ १ ॥**
**मज पाजोनियां भांग । मग घडवी संत—संग ॥**
**गुरु सांगे मजला गुह्य । मारुनि हांक ॥ २ ॥**

[ सुमती डोक्यावर पाण्याची घागर, अंगावर ओलं वस्त्र अशी येते. घागर उतरून ठेऊन गोप्याच्या पाया पडते व पुन्हा घागर उचलायला जाते. ] थांबा. बाई तुम्हीं कोण ?

**सुमती**—मी या पंढरपूरची. माझं नाव सुमती. सहा महिने झाले. माझे पती कुठं एकाकी नाहींसे झाले. घरीं मी नि माझं एक वर्षाचं बाळ. दुसरं कुण्णी नाहीं.

**गोप्या**—देवा देवा. काय हा प्रसंग ? बाई, काय बरं आपल्या पतीचं नाव ?

का ! रागवायचं कारण नाहीं. नाव कळलं तर अंतर्ज्ञानानं ठावठिकाणा हुडकता येईल.

**सुमती**—[ सलज्ज ] कमलाकर.

**गोप्या**—अस्सं ? कमलाकर. पंढरपूरची. पती परागंदा. पहातें हं. [ डोळे मिटून ] ' गुरु सांगे मजला गुह्य । मारुनि हाक । मी सद्‌गुरुची लेक, [ डोळे उघडून ] छें:. बाई कुठं ठावठिकाणा लागत नाहीं. तरी पण भिऊं नका अधीर होऊं नका. तुम्हाला आज कुणी सती भेटेल. ती सद्‌गुरु गाठून देईल. त्याच्या पायावर आपला देह टाकून लोटांगण घाला. संतसंग घडला कीं तुमची मनकामना पूर्ण.

**सुमती**—अगबाई, खरच ! बाकी पांडुरंगानं काल रात्रीं स्वप्नांत मला हाच दृष्टांत दिला.

**गोप्या**—खरं कीं काय ! तरीच ' गुरु सांगे मजला गुह्य ' -

**सुमती**—काय सांगूं बाई. स्वप्नात मला पांडुरंग दिसले; नि ते म्हणाले बाई, पंढरपुरांत नामदेवाची दासी सती जनाबाई आहे. तिला एकादशीस भेट म्हणजे ती तुला संत दर्शन घडवील. मग तूं संताना द्वादशीस उपोषणाचं पारणं फेडायला आपल्या घरीं बोलाव, म्हणजे संताच्या आशीर्वादानं तुला तुझा पती भेटेल.

**गोप्या**—अहाहा, पांडुरंगाचाच दृष्टांत तो. खोटा कसा ठरेल ? बाई तुमचं अदृष्ट संपलं. अहो मीच ती जनाबाई.

**सुमती**—आपण जनाबाई ? मग काल स्वप्नांत दिसली तिचा चेहरा—

**गोप्या**—हा अस्सा नव्हता, असंच ना ? अहो मग बरोबरच आहे. तुम्हीं स्वप्नात असताना तुमचे डोळे मिटलेले होते ना ? मग आतां उघड्या डोळ्यानीं पहात असता, इतका फरक हा दिसायचाच. अहो खोटं नाहीं. मीच जनाबाई आणि हे पहा माझे नामदेवही आले. आता सावध. हें पहा मीं पाया पडलें, कीं तुम्हींही आपला देह त्याच्या पायावर घाला. [ महंत घोटाळे चिपळ्या घेऊन भजन करीत येतो. दोन्ही बाजूला कन्याकुमारी सती, हातात चौऱ्या घेऊन नि तोतरंभट हातांत छत्रचामरें घेऊन अशा थाटांत. ]

**महंत—**

> **टाळकुटे संत । झाले कलीमाजि अनंत ॥ धृ० ॥**
> **रांडा पोरें फिरति दिगंत । रडती नांवें, मुळि ना खंत ।**
> **कसले हे संत ? । ते ना अम्हां पसंत ॥ १ ॥**

गोविंद गोविंद । गीत गोविद गोविद । राधे गोविद गोविंद । गोपी गोविद गोविंद । [ गोप्या पाया पडतो ] राधे गोविद गोविंद [ सुमती पाया पडंत ] राधे तुझा लागला छंद । गोविंद गोविद । अहाहा, कन्याकुमारी सतींनो, आमचा तुम्हाला गोविंदा आहे.

**गोप्या**—ऐकलंत बाई, तुम्हाला स्वामींचा गोविंदा आहे.

**सुमती**—म्हणजे ! मी नाहीं समजलें.

**गोप्या**—अहो, हेंच समजायला पूर्वसुकृत लागतं-पूर्वपुण्याई लागतं. माझ्या बाबाच्या पूर्वपुण्याईनं [ स्वगत ] नि आज ठणठण् नाण्याच्या कमाईन [ उघड ] बाबानी मला स्वामींना अर्पण केली नि मी स्वामीची आध्यात्मिक पत्नी झालें ब्रह्मपदी पोंचलें. ब्रम्हसुखाचा साक्षात् भोग भोगू लागलें. बाई, तुम्हीही अशाच ब्रम्हपदीं पोंचाल तर तुम्हालाही—'गुरु सांगेल तुजला गुह्य । मारुनि हाक । तू सद्गुरूची लेक ।

**सुमती**—हो, पण तुम्हीं सद्गुरुची लेक की पत्नी ?

**महंत**—खुळी रे खुळी. अग हेंच कळायला ब्रह्मपदाचा साक्षात्कार व्हावा लागतो.

**गोप्या**—बाई, मी पित्यानं स्वामीना विधीपूर्वक अर्पण केलेली पित्याची लेक—पण स्वामींची आध्यात्मिक पत्नी आहें. स्वामीनी माझ्याशी गोविंदा केल्यामुळ मी कन्याकुमारी अखंड सौभाग्यवती सती झालें आहे. होय ना ? मी आपली पत्नी ना ? बोला—

> **बोल सख्या मधु बोल तुं राया ।**
> **असा अबोला अतां कां प्रिया ॥**
> **सुधा बोल मुखिं; ना मनिं माया ? ॥ धृ० ॥**

आहे ना मी, त्वदीय जाया।
अर्पण केली, मदीय काया।
तुझ्याच पायीं, हो ना राया।
बोल, करी मम बोल न वायां ॥ १ ॥

**महंत**—अग बोलायला कशाला हवं ? मी तुझा गोविंदाच आहें.

**सुमती**—पण हा गोविंदा काय तो नाही समजला ?

**महंत**—समजेल—समजेल. हलु हलु समजेल.

**गोप्या**—हलु हलु कशाला ? आताच सागून टाकतें. बाई, तें असं आहे. स्वामी जें बोलतात तेंच आध्यात्म ! तेंच ब्रम्ह ! [ स्वगत ] आणि त्यामुळंच सारा होतो ब्रम्हघोटाळा. [ उघड ] अहो त्याचं नावच काय आहे पहा. अनंगपोटी लचाडनायक—ब्रम्हघोटाळे—महंत भोगीराज स्वामी महाराज. आमचे स्वामी जसा गोविदा बोलतात तसा तो करतातही. ब्रम्हच तें. मुमुक्षूंनी नुसत जाणायच असतं. आताच पहाना. स्वामी आमचा गोविदा आहे असं म्हणाले—अर्थ—आशीर्वाद आहे. आता समजा. स्वामींनी कुणा स्त्रीच्या अंगावर हात टाकला—का ? अशा चपापलात का ?—हा पहा असा माझ्या अंगावर हात टाकला, तर स्वामींनी माझ्या अंगावर गोविंदा केला, असंच म्हणायचं. समजलं ?

**महंत**—समजेल—समजेल. हलु हलु समजेल. कन्याकुमारी सती गोपी, या सती कोण ! गोविंदा कर.

**गोप्या**—करतें महाराज. या पंढरपुरात कमळाकर नावाचा ब्राम्हण आहे; त्याची ही बायको. हिचं नाव सुमती. हिला वर्षाचं एक बाळ आहे. सहा महिने झाले. हिचा पती परागंदा आहे. पतीची भेट व्हावी—

**महंत**—तें मला ऐकायला नको आहे. तें सारं मला अंतर्ज्ञानानं कळतं. अंतःचक्षूंना दिसतं आहे. आता पहाच चमत्कार. हीं पहा डोळयापुढं अद्भुत वर्तुळं दिसूं लागलीं—

[ डोळे मिटून भजन करीत नाचूं लागतो. ]

गोपि-मन हरी । मथुरेचा हरी । कान्हा ।
मधु बन्सी बजाव तूं न भुलवि हरी । राधे ।
बन्सी बजाव न हरी ॥ धृ० ॥
हा करि रास हमामा गौळणिसाथ ।
ॐ परब्रह्म पढाया गीताधर्म ।
ॐ करिं सुंदरि घे हरी ।
चुंबन गालीं करी । कान्हा ।
गोविंद करी ।

**गोप्या**—राहिलंत बाई, लागली आता ही समाधी. झाला अंगात हा संचार. हा संचार असा का घुमूं लागला–स्वामीमहाराज विषयाशी असे का तद्रुप झाले की मग ही अशी विदेह स्थिति येते. यावेळीं ब्रम्हानदीं लागे टाळी मग देहात कोण साभाळी ?

**महंत**—
ना कुंजवनीं तूं भुलवि हरी । राधे ।
कुंजवनीं तूं हरी ॥ १ ॥
वृंदवनामधिं गोपि डुबे डोहीं ।
वस्त्रें चोरिहि हृदयाला ।
ॐ रंगीला हो ।
नग्न ललना जलीं । देखे ।
गोविंद करी ।
म्हणे संत गोविंद तूं करिसि हरी । कान्हा ।
महंत 'गोविंदा' करी ॥ २ ॥

**गोप्या**—या छंदाच्या एकतानतेत नि संचाराच्या या तद्रींत स्वामी जें गुह्य बरळतील तेंच धर्मशास्त्र. भाविक मुमुक्षुंनी वेदवाक्य म्हणून नुसत ऐकायच नि तस्सं वागायचं असतं. आता बघ. समाधी उतरू लागली. आता गुरु सांगेल मजला गुह्य । मारुनि हाक । मी सद्गुरुची लेक ॥

**महंत**—[ डोळे उघडून ] ऐक. कन्याकुमारी सती गोपिके, तुला या सतीचं भूत भविष्य ऐकून घ्यावयाची मुमूक्षा असेल तर ऐक. हिचं नाव सुमती आहे. ही स्त्री आहे. हिच्या नवऱ्याचं नाव कमलाकर. तो पुरुष आहे. तो पुरुष आणि ही स्त्री नवराबायको होती. कारण त्यांना एक मूल झालं आहे. तें सुमारें एक वर्षाचं आहे. आज हीं दोघें नवराबायको नाहींत. कारण नवरा परागंदा आहे. बावा हा असा गोविंदा होऊन सहा महिने लोटले आहेत. नवरा परत येऊन पुन्हा गोविंदा व्हावा, अशी हिची इच्छा आहे. पण हे हिच्या कपाळी नाहीं. कारण हा देवाचा कोप आहे. लग्न हे परमार्थासाठीं असतं, पोरं होण्यासाठी नसतं. असं लग्न करण्यात या सतीनं देवाचा अपराध केला आहे. त्याचं फळ ती भोगते आहे. आतां तरी हिनं पुढं चूक सुधारावी, हें उचित आहे. सत्पुरुष हाच अखंड नवरा. इतर नवरे हवेत कशाला ? तव्हा परमार्थासाठीं हिनं मठात यावं, देवाच व्हावं, नि गोविंदा करावा; विचार, विचार. तिला आहे मान्य ?

**गोप्या**—बोल बाई. ऐकलीस ना संतवाणी ? मग दे उत्तर. आहे मान्य ?

**सुमती**—बाई, यातलं मला काही कळलं नाहीं.

**महंत**—कळेल, कळेल, हळुहळु कळेल.

**गोप्या**—बाई, प्रारब्ध भोगलं पाहिजे ना ? ते भोगायचं असेल तर संतवाणी सागते आहे–तूं मठवासी हो–देवाची हो.

**सुमती**—बाई, देवाची व्हावं, हीच तर माझी इच्छा. माझी नि माझ्या पतीची गाठ पडावी—

**महंत**—कशाला ? पुन्हा संसारात पडायला ? ही अधोगती आहे. मी तुला त्या मार्गानं जाऊं देणार नाहीं. कशाला संसार करतेस ? कशाला पतीच्या नावानं रडतेस ? ही माया आहे. मठात चल नि ब्रम्ह गाठ. परमार्थासाठी मला अर्पण होऊन गोविंदा कर.

**सुमती**—आग लागली तुझ्या तोंडाला. मेल्या, आता सारं काहीं मला समजलं.

**महंत**—समजेल–समजेल, हळु हळु समजेल.

**सुमती**—मेल्या, भोंदू महंता, आणखी काय समजायचं राहिलं आहे ? ढोंग्या, सोड माझी वाट.

**महंत**—कुठं चाललीस ! आतां घर विसर नि मटात चल. त्यांतच तुझा गोविंदा आहे, तुझ्या कुळाचा गोविंदा आहे.

**सुमती**—मेल्या, माझी नि माझ्या कुळाच्या कल्याणाची तुला कशाला हवी काळजी ?

**महंत**—कारण, त्यातच जगाचं कल्याण आहे.

**सुमती**—पापी तूं. कशाला सागतोस जगाच्या कल्याणाच्या गोष्टी ? सोड माझी वाट.

**महंत**—बिलकुल नाहीं. बऱ्या बोलानं माझ्याशी गोविंदा करतेस की परमार्थासाठीं जबरदस्तीनं [ हात धरायला जातो. ती झिडकारते ]

**सुमती**—खबरदार ! हो दूर. पापिष्टा, मी एकटी असले तरी पांडुरंगाच्या या पढरींतील एक सत्वस्थ ब्राम्हणस्त्री आहे.

**महंत**—ही घमेंड ? मग तुझ्या सत्त्वाची परीक्षा पहायला हा पहा प्रथम तुझा कोमल हात धरून—तुझ्या लुसलुशीत गालावर—

**सुमती**—[ श्रीमुखात देते. ] हा घे गोविंदा.

**महंत**—काय गोविंदा ? माझ्या गालावर गोविंदा ?

**गोप्या**—बाई, काय केलंत हें ? आजवर आमच्या स्वामींनीं शेकडो स्त्रियांच्या अंगावर हात टाकला असेल. पण स्वामींच्या अंगावर हात टाकणारी स्त्री—बाई, तूं पहिलीच ग पहिली ! म्हणून म्हणतें, चल, शरण ये.

**सुमती**—चल हो बाजूला कुलटे.

**गोप्या**—कुलटा ! कोण मी ? छः. मी कोण आहें बघ. मी सद्‌गुरुची लेक आहें लेक. आणि म्हणूनच सागतें, याना शरण ये. नाहींतर या साधुपुरुषाच्या क्रोधाग्नीत भस्म होऊन जाशील, आणि ब्राम्हणस्त्रीहत्येचं पातक स्वामीच्या माथीं बसेल.

**सुमती**—तोंड पहा मुर्दाडाचं. हें खापरतोंड माझं भस्म करणार !

**महंत**—पण छः, गोपी, मी महंत आहें. क्रोध हा माझा वैरी आहे. संताप माझा रिपु आहे. काम, क्रोध, मद, मत्सर हे षड्रिपु मला वर्ज आहेत.

**गोप्या**—[ स्वगत ] तें दिसतंच आहे. कारण राधे तुझा लागला छंद.

**महंत**—म्हणून म्हणतों गोपी, तूच पुढं हो नि हिला मेल्या कुत्रीच्या मढ्यासारखी फरफटत ओढीत मठात खेंच. चल हो पुढं.

**गोप्या**—बाई, चल हो पुढं. अग तुझ्या कल्याणासाठीं, तुझ्या कुळाच्या कल्याणासाठीं, जगाच्या कल्याणासाठीं ? काय नाहीं ? मग धर्मप्रचारासाठीं, परमार्थासाठी, स्वामीआज्ञा प्रमाण मानून नि तुझा हा हात अस्सा खेंचून—[तिला खालीं पाडतात.]

**महंत**—सूड मला घेता येत नाहीं; कारण मी महंत आहे. पण मला दान जसं घेता येत तसं देताही येतं. शय्यादान दिलंस तर तें मी मोठ्या आनंदानं घेईन. पण तें नसेल तर हें घे लत्तादान. [ लाथ मारतो. जनाबाई येते. तिला सोडतात. ]

**जनाबाई**—वारे साधु ! वारे संत ! वारे महंत ! नमोनमः स्वामी महाराज.

**महंत**—[ हात जोडून नि दृष्टी वर करून ] पुंडलीक वरदा हरि विठ्ठल. पार्वती पते हरहर महादेव—

**गोप्या**—[ स्वगत ] हरहर महादेव—

**महंत**—सीताकांत स्मरण जयजय राम. घालीन लोटांगण, वंदीन चरण, डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें. [ साष्टांग प्रणिपात घालतो. ]

**जना०**—चल, ऊठ, हो दूर. ढोंगी ! भोंदू ! लाज नाही वाटत ? तुझ्या मठाचा महिमा मी आजवर कानानी ऐकत होतें. पण आज डोळ्यानी प्रत्यक्ष पहायला मिळाला. जातीनं तूं ब्राम्हण. मी एक शूद्र स्त्री. माझ्या पाया पडतोस ? लाज नाही वाटत ? ब्राम्हणाच्या चरणरजानं आम्हा हीन जनाना शुद्धता यायची—

**महंत**—हाच तर आम्हा ब्राम्हणाच्या लत्ताप्रहाराचा महिमा. भगवान् भृगुमुनीनं भगवान विष्णूच्या हृदयावर लाथ मारली तें भृगुलांछन भगवंतानीं आपल्या हृदयावर भूषण म्हणूनच नाहीं का मिरवलं ?

**जना०**—पण विटंबनेनं तेंच तुझ्या जिव्हाग्रीं दूषण नाहीं का होऊन बसलं ! अहाहा, ब्राम्हण म्हणजे ईश्वराचं मुख ! धर्माचं कवच ! ज्याना साष्टांग नमस्कार घातला असता साक्षात् वैकुंठ मिळतं, ज्याचं पूजन केलं असता, साक्षात् अच्युतपदाची जोड मिळते, त्याच वेदकालीन खऱ्या ब्राम्हणाचं तेज—

**महंत**—माझ्या ठायीं आहे. पंढरीच्या या महंताच्या ठायीं आहे.

**गोप्या**—[ स्वगत ] खरंच. कारण राधे तुझा लागला छंद.

**जना०**—छः, तें तेज या सत्त्वस्थ ब्राम्हणस्त्रीच्या ठायी आहे. या ब्रम्हतेजाला माझा प्रणाम असो. [ तिच्या पाया पडते. ] पवित्र आर्यधर्माचं रक्षण आज कुणी करीत असतील तर तें या अशा ब्राम्हणस्त्रियाच. धर्मबुडव्या पापात्म्यानों, तुमचीं तोंडंही पाहूं नयेत. चला काळं करा. जा नि पापक्षालनार्थ चंद्रभागेंत स्नानं करा. जा म्हणतेंना. जाता की सारी संत मंडळी गोळा करून तुमची नि तुमच्या मठाची दुष्कीर्ती साऱ्या पंढरपुरात जाहीर करू ?

**गोप्या**—[ एकीकडे ] महंत, हं. इथून आता गोविंदा—

**महंत**—[ गोप्यास ] तुम्ही प्रथम करा. मी करतों मागून. नाहीतर मी एका स्त्रीला भ्यालों असं होईल.

**जना०**—हं चला. चला म्हणतें ना ?

**तोतरं०**—सरक् भयो. [ जातो. ]

**गोप्या**—गोविंद गोविंद. राधे तुझा लागला छंद—[ इतर कुमारीसह जातो. ]

**जना०**—हं, आता स्वामी महाराज, आपण ! नाहीतर करतें सारे संत गोळा.

**महंत**—कुठले संत ? मीच संत. संताचा संत. मीच महंत ! बाकीचे कसले संत ? "कसले हे संत ? । मुळीं ना मला पसंत." [ जातो. ]

**सुमती**—[ स्वगत ] स्वप्नात दिसला तोच हा चेहरा. [ जनाबाईच्या पाया पडते. ] बाई, तुम्हीच खऱ्या जनाबाई.

**जना०**—बाई, ऊठ. तूं खरी ब्राम्हणस्त्री आहेस. खरी सुमती आहेस.

**सुमती**—जनाबाई, माझी कर्मकहाणी—

**जना०**—मी सारी जाणतें मलाही पांडुरंगान स्वप्नदृष्टात दिला आहे. चल, मी तुला संतांच्या पायावर घालतें. तुझं कल्याण होईल. चंद्रभागेच्या वाळवंटावर, आतांच श्री ज्ञानदेवीची पालखी येईल; तिथं सारे संत गोळा होतील तिथंच चल, आणि संताना शरण जा. चल, प्रथम राऊळात चल. पंढरीरायाचं दर्शन घेऊन नंतरच चंद्रभागेवर जाऊं.

**सुमती**—पण राऊळात या वाटेनं ? पंढरीच्या पेठेंतून ? भरल्या बाजारातून ?
**जना०**—होय, पंढरीच्या पेठेंतून ! भरल्या बाजारातून ! गळयात तुळसीमाळ नि हाती भजनी टाळ, या थाटात पांडुरंगाचं नाव घेत दिगंत फिरताना या जनीला कसली शरम ? बाई, माथीं बुक्याचा मळवट फासून, ही जनी म्हणजे रखुमाईच्या नावानं पंढरीच्या पेठेंत नित्य जोगवा मागत फिरणारी येसवा. हा पहा, डोईवरचा पदर अस्सा खांद्यावर घेऊन ही मी भरल्या बाजारी चाललें—

**डोईचा पदर । आला खांद्यावरी ।**
**भरल्या बाजारीं । जाईन मी ॥ धृ० ॥**
**हातीं घेई टाळ । खांद्यावरि वीणा ।**
**आतां मज मना । कोण करी ? ॥ १ ॥**
**जनी म्हणे देवा । झालें मी येसवा ।**
**निघालें केशवा । घर तुझें ॥ २ ॥**

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळः**—पंढरपूर. चंद्रभागेचें वाळवंट. वारकरी व वारकरीण. ]

**वारकरी**—

**येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ।**
**भीमा आणि चंद्रभागा । तुझ्या चरणीच्या गंगा ।**

[ भजन करीत असता बहिरंभट येतो. ]

**बहिरं०**—माझे आई, आता आटपा लवकर.
**वार०**—अहाहा, धन्य ही पंढरी, धन्य श्रीहरी आणि धन्य ही चंद्रभागा—
**बहिरं०**—आणि धन्य तूं महाभागा. माझे आई, कोंपरापासून हात जोडतों, आटपा लवकर. आज आषाढीची वारी म्हणजे आम्हाला कोण पर्वणीचा योग.

**वार॰**—खरच, ज्याच्या गाठीं पुण्य असेल, त्यानं जन्मास यावं नि एकदां तरी आषाढीस पंढरीस यावं.

**बहिरं॰**—पुण्य कशाला हवं? ठण् ठण् नाणं असलं तर एकदाच कां हजारवेळा यावं.

**वार॰**—अहाहा काय या पताका? या दिंड्या? या गाळण्या? हे वारकरी! हे साधुसंत—

**बहिरं॰**—आणि हे असले यजमान. काय कपाळ फोडायचं आहे याच्यापुढं. अहो टाळकुटे, अजून मला पुष्कळ यजमान आटपायचीं आहेत. आता आटपा लवकर. ही पहा गोराबाची दिंडी वाजूं लागली. ही दिंडी इथून जाऊन नामदेवाच्या दिंडीला मिळेल. बाकी संताच्या दिंड्या केव्हाच इथं येऊन मिळाल्या आहेत. आणि या साऱ्या दिंड्या एक होऊन आळंदीहून ज्ञानेश्वराची श्रीज्ञानदेवीची पालखी येईल तिला त्याच जागी सामोऱ्या जातील. आणि ज्ञानेश्वरीच्या पोथीचा पहिला सत्कारसमारंभ चंद्रभागेच्या याच वाळवटावर होईल. आता इथं गर्दी कोण तोबा उडेल? म्हणून म्हणतों चला प्रथम नदीस्नानाला. स्नान झाली कीं देवदर्शन घडवतों कीं झालों मोकळा दुसरी यजमान गाठायला

**वार॰**—आणि नदीवर आमच्या घरचीचं सवाष्णवाण घ्यायला—

**बहिरं॰**—माझी बाहेरची आहे ना? ही पहा आली. अग ए, आलीस? [ गोप्या ठुमकत मुरडत येतो ] चल घे याना नदीवर. [ जाऊं लागतात. ] पण हो थांबा. चाललात काय? दक्षिणा काढा. नदीवर प्रत्येकी दोन दोन मुद्रिका. एक संकल्पाला नि एक पुंडालेकाला. वाटेवरचे देव, दगड, धोंड, याना प्रत्येकीं एक एक.

**वार॰**—अहो म्हणजे किती?

**बहिरं॰**—द्या ओंजळभर प्रथम.

**वार॰**—इतके?

**बहिरं॰**—आ? मग कितके? चल, सोड थैलीची गाठ!

**वार॰**—देवाच्या गाठीपूर्वी पडली आहे खरी तुम्हा भूदेवाशीं गाठ!

**बहिरं०**—आता सोडतोस कीं बडवू ?

**बार०**—आहातच नावाचे बडवे. सारा अन्नमहिमा तुमचा. यात्रेकरूंना बडवाल, लुबाडाल काय वाटेल तें कराल.

**बहिरं०**—होय ना ? आहे ना खात्री ? मग काढ नाणं.

**बार०**—अहो किती !

**बहिरं०**—जितकं असेल तितकं.

**बार०**—हें घ्या. [ देतो. ]

**बहिरं०**—एवढंच ! बरं काही नवसाच्या मुद्रिका !

**बार०**—विसरलोंच कीं—नवस ना ? होय, केला होता—

**बहिरं०**—अहो, तुम्हीं विसराल पण आम्हीं कसे विसरूं ? काढा नवसाचं नाणं.

**बार०**—अहो नवस केला—पण कसला ? काहींच दान न करण्याचा.

**बहिरं०**—मूर्ख आहात झालं.

**बार०**—तुमच्या दारीं आलों तेव्हाच ठरलं तें.

**बहिरं०**—बरं, काहीं गुप्तदान ?

**बार०**—अहो, मला काहीं गुप्त व्याधीच नाहीं. गुपचुप काहीं घडलंच नाही, तर गुप्तदान कसलं करूं !

**बहिरं०**—छट् आहे मोठा. दाद लागूं देत नाहीं.

**गोप्या**—मग चलायचं यजमान नदीवर. बाई, चलायचं ना ? दमल्याभागल्या असाल तर हात धरून नेतें. [ बाईचा हात धरून नेतो.] [ स्वगत ] गोविंद राधे गोविंद. [ जातात. ]

**बार०**—अहाहा, धन्य पंढरी—धन्य श्रीहरी—धन्य चंद्रभागा ! [ जातो. ]

[ नंतर गोरोबासह गोरोबाची दिंडी येते. ]

**दिंडी—** **वाळवंटीं । चंद्रभागेच्या काठीं । ऊभा विठ्ठल ।**<br>**पंढरपुरीं । चंद्रभागेच्या तीरीं । रखुमाविठ्ठल ।**

पुंडलीक वरदा हरी विठ्ठल. श्री गोरोबामहाराज की जय.

**गोरोबा**—अहाहा, पंढरीराया—

आषाढी पर्वणी आला यात्राकाळ । पातले सकल वारकरी ।
धन्य पुण्यतीथी आली एकादशी । पावले क्षेत्रासी विश्वजन ।
निवृत्ति ज्ञानदेव सोपान सावता । नामयाची कथा ऐकायासी ।
गोरियाचे नेत्रीं आले जलबिंदु । मज का गोविंदु विसरला ? ।

खरंच, पांडुरंग या गोऱ्याकुंभाराला तेवढा का बरं विसरला ? सर्व संत नि वारकरी हातानं टाळ्या वाजवून भजन करतात; पण तें भाग्य माझ्या नशिबीं का नसावं ? देवा, या गोऱ्याकुंभाराला हात नाहीत. माझ्या बायकोन-संतीनं माझ्या अंगाला स्पर्श कराल, तर विठोबाची शपथ. अशी तुझ्या नावाची शपथ घातली. पुढं एके रात्रीं झोपेंत बायकोनं बळेंच माझे हात आपले अंगावर घेतले. जागा होऊन पहातों तो विठ्ठलाच्या शपथेविरुद्ध माझे हातून पापाचरण घडलं. त्याचक्षणीं मी आपले दोन्ही हात तोडून थोंट केले. काय ही दैवाची विचित्र घटना ? गेल्या आषाढीस याच चंद्रभागेच्या वाळवंटावर या उजव्या हातीं कुंभाराचं थापटण थोपटून नामदेवाचा कच्चं मडकं म्हणून उपहास केला ! आणि आज या एकादशीस देवा, मी तुझ्यासमोर असा थोटा आलों अं ! देवा, नामदेव तुझा परम भक्त. त्याला थोपटण्याच पाप हातीं घडलं म्हणून तर देवा, तूं ही मला शिक्षा दिलीस असंच मी समजूं काय ? देवा, तुझ्या नावाची शपथ पाळण्यासाठीं हे हात गेले, याचं मला दुःख होत नाहीं. पण हात नसल्यामुळं इतराप्रमाणं हातीं टाळी वाजवून तुझ्या भजनाला मी अतरलों याचंच मला दुःख होतं. देवा—

का गा केशीराजा मोकळीलें मातें । शरण मी कुणातें जाऊं आता ।
आता माझी लाज राखे पंढरीराया । तुजवीण त्राता कोणी नाहीं ।

विठ्ठल-विठ्ठल-बोला-विठ्ठल विठ्ठल—

**वारकरी**—

**बोल इट्टल इट्टल रे, पांडुरंग इट्टल । बोला ॥ धृ० ॥**
**आपुत् सोयरे जनू कावळे, जमत्याल भोंतीं तुझ्या बापा ।**

**टोचुन टोचुन घेत्याल मंग बा, धाय धाय रडशील रे ॥ १ ॥**
**जुमीन जुमला ल्योक बाईल माजी माजी तूं म्हनसी ।**
**परान जाइल तवां कोन बा, तुज्या सांगतीं येईल रे ॥ २ ॥**
**बाग वाडा इथं ठिवुनशान, नेत्याल तुज बा यमपुरीं ।**
**पोरं बाळं घेत्याल वाटुन, म्होतुर लाविल बाईल रे ॥ ३ ॥**
**नामघोस हा मंतर साचा, उमगुनि घेई तूं ध्येनीं ।**
**त्यो घोकुन तूं पाक मनानं, वैकुंठीं जाशील रे ॥ ४ ॥**

पुंडलीक वरदा हरि विठ्ठल. गोरोबा महाराज की जय.

[ भजन करीत दिंडी जाते. बहिरंभट व तोतरंभट येतात. ]

**तोतरं०**—सरक भया. अरे बाबा, तो गोप्या कुठ आहे ? तू कुठं आहेस ?

**बहिरं०**—यजमानं [ पैसे वाजवून ] गोळा करतोय.

**तोतरं०**—पण मठात लोक गोळा झाले आहेत, नि स्वामी गोप्याची वाट पहाताहेत. ज्ञानदेवीच्या सत्काराला विरोध करायचा ठरवल आहे स्वामींनीं. सरक भया. पण कन्याकुमारी सती गोपिका—

**बहिरं०**—ही पहा आलीच. [ वारकरी, वारकरीण व गोप्या येतात. ] आलात ? या—

**गोप्या**—एकलं का ? पांडुरंगाची कृपा झाली. एक मोठा अपघात टळला. या बाई नदीत उतरल्या नि पाऊल वाकडं पडून आडव्या झाल्या. मग मीही बुडी मारली. चांगली खोल. नि हिला घट्ट मिठी मारून बाहेर काढली. चांगली भिजली ओली चिंब. पण आमचे हे यजमान नुसते आ वासून काठावर उभे. कोरडे ठणठणित !

**बहिरं०**—( स्वगत ) अरे चोरा. ( उघड ) असं झालं होय ? ठीक. मग आता चला देवदर्शनाला. काढा दक्षणा—

**वार०**—आणखी आता कसली ?

**बहिरं०**—आधी पहिली–आमच्या या बाहेरचीनं तुमच्या घरचीला नदींत मिठी नि बुडी मारून जगवली त्याची.

**वार०**—मग ही दक्षिणा की हेल ?

**बहिरं०**—नसेल द्यायची तर देऊं नका.

**तोतरं०**—सरक् भयो.

**बहिरं०**—पण असे हे हेल काय काढता ? बर देवदर्शनाची तरी द्याल ? देव-ळात प्रत्येकीं दोन मुद्रिका. एक देवापुढं नि एक ओंघळणीला. रुक्मिणीला प्रत्येकीं एकच. मग काढा मुद्रिका.

**वार०** —या घ्या. ( देतो. )

**बहिरं०**—बरं, माळ, बुक्का, खडीसाखर ?

**वार०**—हो तर.

**बहिरं**—मग काढा दोन मुद्रिका. माळेला एक नि बुक्का, खडीसाखर एक. बरं, नारळचिरळ ?

**वार०**—हो तर.

**बहिरं०**—मग काढा चार मुद्रिका.

**वार०**—बरं. दुसरं काही पूजासाहित्य.

**बहिरं०**—कांहीं विशेष नाहीं. वस्त्रं, दहीं, दूध. पण विकत कांहींच घ्यायला नको. नुसतं नाणं ठेवा. शिवाय सात सेवाधारी त्याना दक्षिणा. देवाला ओंवाळणी. महानैवेद्याची दक्षिणा. ब्राम्हणपूजनाची यथाशक्ती पाच-पंचवीस-पन्नास-हजार. जशी झेंपेल तशी.

**वार०**—अबबबब—

**बहिरं०**—असं 'बें बें बें' काय करता ? अहो ठाऊक आहे मला नाहीं झेंपायची तुम्हाला ती; म्हणून म्हणतों, आता कडोस्तीस कांहीं असेल नसेल तें काढा नि व्हा मोकळे. चला. आटपा लवकर.

**तोतरं०**—सरक् भयो.

**बहिरं०**—चला काढा. [गांण्या लगट करून काढून घेतो.] हं झालं ? आता चला—

**तोतरं०**—सरक् भयो. एकदम स्वामीच्या मठात. अरे हो पण बहिरभटा, या वेळपावतची कमाईची वाटणी—

**बहिरं०**—या हजार मुद्रिका. त्यातल्या तुमच्या पाचशें—

**तोतरं०**—नि नैवेद्याच्या हिशोबापैकी ?

**बहिरं०**—एकंदर दहा नैवेद्य. त्या शंभर मुद्रिका. तितक्याच खर्चाला.

**तोतरं०**—अरं वा ? सरक् भयो. एकच नैवेद्याचं ताट दहा यजमानाकरिता दहादा देवाला भरवलंस, आणि तेंही कालचं शिळं. आणि खर्च दहाचा घेतोस ? अरं वार, सरक भयो. फार तर खर्च एक ताटाचा. नि नऊ ताटाचा फायदा निमंनिम.

**वार०**—पाडुरंगा, तुलाच रे बाबा डोळं.

**बहिरं०**—अहो हा हिशोब इथं चव्हाठ्यावर करायचा नसतो. भिंतीला कान असतात. पण इथ भिंतही नाहीं. पण यजमान भिताडासारखे कान ताठ उभारून ऐकताहेत.

**तोतरं०**—यजमान ऐकताहेत ? मग सरक् भयो. एकदम मठात. तिथं हिशोब.

**बहिरं०**—[ डोळ्यानं खुणवून ] आणि यजमानाचं देवदर्शन ?

**तोतरं०**—गेलं चुलीत. आधीं सरक् भयो. एकदम मठात. [ बहिरंभटाला ओढीत नेतो. बहिरंभट 'असं कसं असं कसं,' करीत जातो. ]

**वार०**—[ गोप्यास ] अहो बाई—

**गोप्या**—बाई ? ठीक.

**वार०**—अहो, तुम्ही तरी चला.

**गोप्या**—कुठं ? देवदर्शनाला ? वा: यजमान. हीं बायकाची कामं वाटतं ? आता या बाईच्या संगती नदींत बुडी मारायला जायचं असेल तर तिथं बोलवा. येईन बरं संगती. अगदीं काकूं नाही करायची बरं का काकू ! [ मुरका मारून जातो. ]

**वार०**—साराच लफंग्याचा नि उचल्याचा बाजार. पण घरचे चल. ही पहा दिंडी आली. पुढं नामदेव, मागं गोरोबा आणि संतमंडळी. मग चल प्रथम राऊळात पाडुरंगाचं दर्शन घेऊं नि मग इथंच येऊं. [ 'विठूचा गजर' इत्यादि भजन करीत बायकोसह जातो. संताची दिंडी येते. सर्वात पुढें नामदेव, मागें गोरोबा

कुंभार, नरहरी सोनार, सावता माळी, चोग्वा मेळा, परिसा भागवत, विसोबा खेचर, इत्यादि—

भजन—श्री ज्ञानदेव नामदेव । मुक्ताबाई जनाबाई ।

पुंडलीक वरदा । हरी विठ्ठल । ]

**नामदेव—**

**नाम गाऊं नाम ध्याऊं । नाम विठोबाला वाहूं ॥ धृ० ॥**
**आम्हीं दैवाचे दैवाचे । दास पंढरीरायाचे ॥ १ ॥**
**टाळ दिंडी घेऊनि हाती । केशवराज गाऊं गीतीं ॥ २ ॥**
**नामा म्हणे लाखोली त्या । अनंत नामें वाहूं विठ्ठला ॥ ३ ॥**

पुंडलीक वरदा हरी विठ्ठल. बोला ज्ञानेश्वर महाराज की जय, श्री ज्ञानदेवांकी जय.

[ इतक्यात महंत कन्याकुमारी मतीच्या परिवारांत येतो. ]

**महंत**—खबरदार. खबरदार त्या आपगावच्या कुळकर्ण्याच्या कर्मभ्रष्ट बोकसंन्याशाच्या धर्मभ्रष्ट कारट्याचा या पंढरपुरात कुणी उदो उदो करील तर.

**नाम०**—कोण ? आपण ?

**महंत**—होय मीच. पंढरपुरवासी अनगपाटी लचाडनायक ब्रम्हघोटाळ मठवासी महंत.

**नाम०**—मठवासी महंत, श्री ज्ञानदेवांसारख्या पवित्र ग्रंथपूजनाला आपला विरोध आहे ?

**महंत**—अलबत् माझा विरोध आहे.

**नाम०**—तो का ?

**महंत**—कारण हा ग्रंथ पवित्र नव्हे म्हणून.

**नाम०**—ज्ञानेश्वरी ग्रंथ पवित्र नव्हे तर जगात पवित्र ग्रंथ तरी कोणता ?

**महंत**—जगात पवित्र ग्रंथ एकच, नि तो महंतलीलामृत.

**नाम०**—काय म्हणता आपण ? ज्ञानदेवी ग्रंथ अपवित्र ? छेः छेः

ज्ञानदेव माझी योग्यांची माऊली ।
जेणें निगमवल्ली प्रगट केली ॥ ध्रु० ॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी ।
ब्रह्मानंद लहरी प्रगट केली ॥ १ ॥
अध्यात्मविद्येचें दाविलेसें रूप ।
चैतन्याचा दीप उजळीला ॥ २ ॥
छपन्न भाषांचा केलासे गौरव ।
भवार्णवीं नांव उभारली ॥ ३ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी ।
एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ४ ॥

**महंत**—सर्व आहात. धर्मभ्रष्ट आहात असले गोडवे गायला त्या ग्रंथाचे.

**नाम०**—अहो तो समग्र ग्रंथ कशाला ? त्यातली एकतरी ओंवी श्रवण केली आहे का आपण ?

**महंत**—छेः त्याची काय जरुरी ? त्यातली ओंवीच काय पण एक अक्षरही कानीं आलं तर मला रौरवाचा धनी व्हावं लागेल, माझीं बेचाळीस कुळं नरकात जातील. माझा पवित्र हिंदुधर्म बुडेल.

**नाम०**—आश्चर्य आहे.

**महंत**—अहो, यात आश्चर्य कसलं ? सांगा. हा ग्रंथ कुणी लिहिला ?

**नाम०**—कुणी म्हणजे ? योगिराज ज्ञानी ज्ञानेश्वर महाराजानी.

**महंत**—म्हणजे कुणी ? आपेगावच्या विठ्ठलपंत कुळकर्ण्याच्या मध्यम कारट्यानेंच ना ? अहो हा विठ्ठलपंत म्हणजे शुद्ध बोकेसंन्यासी. संन्यास घेतला पण बाईल वीशी वाटू लागली. ब्रम्हचर्य झेंपेना म्हणून संन्यासी असतानाच गृहस्थाश्रमी झाला. त्याच आचारभ्रष्ट मातापित्याच्या पोटीं जन्मास आलेलीं निवृत्ति, ज्ञानदेव सोपान, मुक्ता ही अवकळीं कारटीं ना ? मग त्यापैकींच एका आचारभ्रष्ट कारट्यानं लिहिलेला हा ग्रंथ अपवित्र नव्हे का ?

**नाम०**—वाराणशीतलें पूज्य **श्रीपाद** रामानंदस्वामी विठ्ठलपंतांचे गुरु. त्याच्याच अनुज्ञेनं त्यानीं गृहस्थाश्रम घेतला.

**महंत**—अहो, कशाला सागतां त्या वाराणशींतल्या भोगशून्य रामानंदाची महती पंढरपुरच्या या भोगीराज महंतापुढं ? कोण कुठला तो रामानंदस्वामी ? वाराणशींतल्या कबीर नावाच्या मुसलमानाची मुंता थाबवून नि मुंज करून त्याला आपला शिष्य बनवणारा नि रामरहीम सब एक है असला खुळचट धर्मबुडवा उपदेश करणारा तोच ना हा रामानंद स्वामी ? त्या शिखानष्टाला ना देव ना धर्म ! ना जात ना पात ! आणि तो म्हणे याचा गुरु. उजूच आहे. जसा गुरु तसा शिष्य.

**नाम०**—पण गोदातटाकीं पैठणच्या ब्राम्हणानी शुद्धी करून निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान याच्या सशास्त्र मुंजी करवल्या.

**महंत**—त्या पैठणच्या ब्राम्हणाच्याही अकला गेल्या चूलखंडात. [ जनाबाई सुमतीसह येते. ]

**जना०**—आणि पंढरीच्या या ब्राम्हणाच्या अकलेची दिवटी पाजळली आहे याच्या मठात ! काय महंत, तूं स्वतःला हिंदुधर्माचा अभिमानी म्हणवतोस. तू जन्मानं ब्राम्हण पण कर्मानं ?

**गोप्या**— [ स्वगत ] याचं उत्तर हा काय देणार कर्म ?

**जना०**—बोला, गप्प का ? तुम्हीं जन्मानं ब्राम्हण पण कर्मानं ?

**महंत**—ब्राम्हण-ब्राम्हण आणि ब्राम्हण !

**जना०**—कोण म्हणेल तुला ब्राम्हण ? खरा ब्राम्हण—खरा ब्राम्हण एकच. नि तो ' ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर । '

**नाम०**—खरंच, ज्या ब्राम्हणानीं सागराचा घोंट केला नि पाषाणात देवपणा आणला ! ज्यानी वसूला आयुष्य दिलं नि शशीला क्षयी केलं. ज्याच्या अंगीं कोपानं त्रैलोक्याचं भस्म अगर संतोषानं पृथ्वीचा स्वर्ग करायच सामर्थ्य—ज्यांच्या कृपाकटाक्षानं महिषाला वाचा फुटून तो वेदवाणी बोलतो अगर प्रेताला वाचा फुटून त्यात चैतन्य आणता येतं—अशा शापादपि शरादपि वेदोनारायण ब्राम्हणांना या नामदेवाचा साष्टांग प्रणिपात असो. पण काय हो महंत, तुम्ही ?

**जना०**—मी सांगतें याची योग्यता. जन्मानं नि कर्मानं ब्राह्मण अशा ज्ञानदेवाची थोरवी तर केव्हाही मोठीच आहे. पण माझा परात्पर गुरु हा नामदेव—शिंपी गोरोबाकाका कुंभार, नरहरी सोनार, सावता माळी—फार काय ? पण जन्मानं अंत्यज असूनही माझा सखा हा चोखामेळा महार—याच्या पायपोसाची तरी सर याला येईल काय ?

**महंत**—नि त्या तुझ्या ज्ञानदेवाला माझ्या खेटराची तरी सर येईल काय ?

**जना०**—तोंड वर करून कशाला टाकतोस थुंकी त्या सूर्यनारायणावर ? ही थुंकी आभाळात न पोंचता फिरून तुझ्या आगावर पडेल नि चार लोकात तुझंच हसं होईल.

**महंत**—कोण करतो पर्वा त्याची ? उलट हंसणाराचेच दात दिसतील.

**जना०**—पण उलट तेच तुझे पाडतील याची वाट ? काय महंत, कर्मभ्रष्ट, धर्मभ्रष्ट, आचारभ्रष्ट म्हणून ज्ञानदेवाची निंदा करतोस, पण वाचूं तुझ्या कर्माचा पाढा—

**गोप्या**—[ स्वगत ] गोविंद गोविंद०—

**जना०**—काय महंत, सुंदर सुंदर स्त्रियाचा ताडा भोंवतीं गोळा करून मठात वाटेल त्या लीला करणं, नि वाटेवरच्या वाटेल त्या पोरीसोरींच्या अंगावर हात टाकण, हाही तुझ्या धर्मात श्रेष्ठ आचार असेल नाही ?

**गोप्या**—[ स्वगत ] गोविंद गोविंद !

**जना०**—आणि या कोण साळकाय घोळकाय तुझ्या आवतीं भोंवतीं ?

**महंत**—या कन्याकुमारी सती आहेत. त्याच्या पित्यानीं वा पतींनीं त्यांना विधीपूर्वक मला अर्पण केल्या आहेत. त्या माझ्या पारमार्थिक बायका आहेत.

**गोप्या**—हां-मी याची पत्नी आहे. [ बिलगतो. ]

**जना०**—आणि हा अर्पणविधीही श्रेष्ठ आचार असेल नाहीं ? पण काय महंत, इतक्या बायकाच्या कपाळीं कुंकवाचा मळवट फासून नि गळ्यांत मंगळसूत्राचे फास अडकवून परमार्थ अपुरा पडला म्हणूनच वाटतं, आषाढी एकादशीसारख्या पर्वणीच्या दिवशीं, प्रभातकालसारख्या पुण्य वेळीं, या अनाथ, अपंग स्त्रीच्या

या दुबळया दुःखी सुमतीच्या—वाचूं पुढं तुझ्या बदकर्माचा पाढा या थोर थोर संत मंडळी समोर, कीं बऱ्या बोलानं इथून काळं करतोस ?

**गोप्या**—[ एकीकडे ] स्वामी महाराज, काळं उजेडांत आलं तर तोंड गोरंमोरं व्हायचं. मला भय वाटतं या स्त्रीचं. इथून गोविंदा.

**महंत**—[ स्वगत ] माझी सुद्धा घाबरगुंडी उडाली आहे. [ उघड ] अग जा. मी असा घाबरतों की काय ? अग कसा झालों तरी मी महंत आहे. स्वस्थ नाही बसायचा. पंढरपूरच्या हिंदूंचं रान उठवतों—वाळिताचा नि बहिष्काराचा वणवा पेटवून असा डोंब करतों कीं, त्यांत तुम्हां साऱ्या धर्मभ्रष्टांच्या आहुती पडल्याच पाहिजेत.

**जना०**—आहे खरं सामर्थ्य तुझ्या ठायीं तें ! मग जा. काय पराक्रम करून दाखवायचा असेल तो कर जा. इथं आता रेंगाळशील तर तुझं बदकर्म या संत मंडळीपुढं ठेवून तुझी छीः थूः करतें.

**महंत**—अग जा ग. पुष्कळ पाहिले आहेत असले संत. हे संत ? हे कसले संत ? [ 'कसले हे संत' इत्यादि पूर्वोक्त म्हणत जातो. ]

**नाम०**—पण हीं पहा पालखी आलीच. [ श्री ज्ञानदेवांची पालखी व दिंडी येते. पुढें ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान वगैरे ] श्री ज्ञानेश्वर महाराज की जय. श्री ज्ञानदेवों की जय. अहाहा धन्य मी—

**आकाशीं पुष्पक शुभ्र दंड दिसे । बैसोनि आलासे ज्ञानदेव ॥ धृ० ॥**
**शुद्धभावें इच्छी ज्ञानदेव भेटी । येई उठाउठीं भेटूं त्यासी ॥ १ ॥**
**देव म्हणे नाम्या येई भेटी सुखा । ज्ञानदेव सखा उभा येथें ॥ २ ॥**

[ ज्ञानदेवाला कडकडून भेटतो. जनाबाई पंचारती घेऊन ओंवाळते. ]

**जना०**—

**ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ धृ० ॥**
**मरोनियां जावें । बा तुझ्याच पोटीं यावें ॥ १ ॥**
**ऐसें करी माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ २ ॥**
**जावें ओंवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ३ ॥**

पुंडलीक वरदा हरी विठ्ठल. श्री ज्ञानेश्वर महाराज की जय. श्री ज्ञानदेवी की जय.

**ज्ञानेश्वर**—अहाहा, केवढा भाग्याचा दिवस हा! पंढरीच्या विठोबाचे हे सारे संत आज याच पंढरपुरांत पंढरीरायानें मला भेटवले. या भूतलावर अखिल मंगलाचा वर्षाव करणाऱ्या या अशा संतसमुदायाची अशीच सदा भेट होवो.

वर्षत सकळ मंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी।
अनवरत भूमंडळी। भेटो तयां भूतां।

हे संतजन कसे आहेत? तर—

चलां कल्पतरूंचे आरव। चेतना चिंतामणींचे गांव।
बोलते जे अर्णव। पियूषाचे।
चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन।
ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु।

असे हे संत आज मला भेटले. खरोखर धन्य मी. राऊळांत देवा तुझं दर्शन घडेलच. पण या वाळवंटावर, या संतांच्या रूपानं, देवा, तूच मला प्रथम भेटलास, तेव्हा हा सोन्याचा दिवस उगवला, असं मी कां मानूं नये?

**सोनियाचा दिवस आजी अमृत पातला।**
**संत आठवितां रूपीं प्रगट पैं झाला॥ धृ०॥**
**तनु-मन शरण तुझ्या विनटलों पायीं॥ १॥**
**बाप रखुमा-देवीवरा आनु नेणें कांहीं॥ २॥**

**नाम०**—ज्ञानी ज्ञानदेवा, अल्पवयांत आपण अनेक चमत्कार दाखवले. स्वर्गातून पितर खालीं आणले, प्रेतें उठवलीं, भिंत चालवली, रेड्यामुखें वेद वदवले, पण यापेक्षाही मोठा चमत्कार म्हणजे वयाच्या अठराव्या वर्षी, प्रवरेच्या काठीं, नेवासें गावीं महालसेच्या देवालयांत भगवद्गीतेवरील भावार्थदीपिका—म्हणजेच या पालखीतील हा पवित्र ग्रंथ, ही ज्ञानदेवीची पोथी, आपण लिहिलींत हा होय. गीर्वाण भाषेतील व्यासोक्ती आपण महाराष्ट्रीय वैष्णवपंथी वारकरी प्राकृत लोकांना सुबोध होईल, अशी मऱ्हाटी भाषेंत लिहिलीत, हे मराठी भाषेवर व महाराष्ट्रावर आपले अनंत उपकार आहेत.

**ज्ञाने०**—यात माझे उपकार कसले ? मी काय केलं ! सर्व कर्ताकरविता, बोलता बोलविता धणी एक पांडुरंग ! संस्कृतात व्यासानी भारत लिहलं; आणि भगवंताच्या मुखातून अर्जुनास गीताधर्म ऐकविला. म्हणोनि ' श्री व्यासाचा हा थोरु । विश्वासि झाला उपकारु । ' त्यात माझे कसले उपकार ? ज्या पांडुरंगानं, ' माझा मऱ्हाठाची बोल कौतुकें । परि अमृतातेंहि पैजा जिंके । ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन । ' असा मराठी भाषेबद्दल आदर आणि आत्मविश्वास माझ्या ठायीं उत्पन्न केला, आणि ज्या पांडुरंगानं माझ्याकडून ' व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु । ' हा ग्रंथ संपूर्ण अनुवादला, त्याच पांडुरंगाचे पायीं— ' भरोनी सद्भावाची अंजुळी । मिया ओंविया फुलें मोकळीं । अर्पिली अंघ्रियुगुलीं । विश्वरूपाच्या । ' आणि याच भावबुद्धीनं ही ज्ञानेश्वरीची पोथी पांडुरंगाच्या पायावर घालण्यासाठीं आज मी पंढरपुरात आलों आहें.

**जना०**—आणि ज्ञानीराया, त्याच पांडुरंगाच्या स्वप्नदृष्टांतान तुम्हा संतमंडळीच्या पायावर घालण्यासाठी मी एका अनाथ, अपंग भगिनीला घेऊन आलें आहें. सुमती, हो पुढं नि पड पाया या संतांच्या.

**नाम०**—कशाला ? आम्हा सर्व संतात वयानं, ज्ञानानं नि भक्तीनं गोरोबाकाका श्रेष्ठ आहेत; त्याच्याच पाया पड म्हणजे झालं. [ सुमती पाया पडते. ]

**जना०**—हिचं नाव सुमती. हिचा नवरा कमळाकर. तो आहे परागंदा. तो भेटावा या इच्छेनं हिनं संताना घरी जेवायला बोलवायचा नवस केला आहे; आणि म्हणून उद्या द्वादशीचं पारणं हिच्या घरीं सर्व संतानी फेडावं, अशी हिची इच्छा आहे.

**नाम०**—पांडुरंगाच्या भक्ताची इच्छा सफल करणार पांडुरंग समर्थ आहे.

**ज्ञाने०**—[ स्वगत ] आणि ही घटना घडवून आणण्यात पांडुरंगाचा संकेत उघड आहे.

**नाम०**—मग चला आता. प्रथम चंद्रभागेच्या या वाळवंटात भक्तराज पुंडलीकाच्या समाधी शेजारीं श्री ज्ञानदेवांची आरती ओवाळूं नि नंतर ही पोथी राऊळात नेवूं.

[ पालखींतील पोथीची पूजा व आरती करतात. ]

**सर्व संत—**

**आरती ज्ञानदेवी । महा कैवल्य दायी ।**
**सेवितां साधुसंत । मनु वेधिला अमुचा ॥ धृ० ॥**
**प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ।**
**अनुवाद गीतेचा । सार्थ नाम ज्ञानदेवी ॥ १ ॥**

**पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ।**

चला,

**विठोबा मला मूळ धाडा ।**
**धांवत येईन दुडदुडा ॥**

[ भजन करीत जातात. पालखी हालते. पडदा. ]

---

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—ब्रह्मघोटाळे महंत याचा मठ. आषाढी एकादशी–दुपार. बहिरंभटाला तोतरंभट ओढीत आणतो. ]

**तोतरंभट**—हं, चल. सरक् भयो.

**बहिरंभट**—अरे वारे सरक् भयो. मोठा आला आहे हातानं खेंचायला. म्हणं सरक् भयो. तूं सरक् भयो, तुझा बाप सरक् भयो, तुझा आजा सरक् भयो, अरे, तेरे सारे पितर सरक् भयो.

**तोतरं०**—हा हा, खबरदार पितरबितर काढशील तर.

**बहिरं०**—काय करशील ? हरामखोरा, नैवेद्यासह वाळवंटावरील माझ्या आजच्या साऱ्या कमाईचा हिशोब करून निम्मं नाणं टण टण् वाजवून घेतलंस आणि तुझ्या कमाईचा नुसता हिशोब द्यायचे कामीं ठकबाजी होय ? पटव नाणं रोख. नाहींतर—

**तोतरं०** –नाहींतर काय ? [ बहिरंभट मानेवर हात घालतो तो सोडवून ] नाहीं तसं नाहीं ! असं पहा. तुला नाहीं पोरबाळ; बायको होती तीही आटपली.

**बहिरं०**—हो, बाकी ती जर जिवंत असती, तर या मठात स्वामीना अर्पण करून, कसा थाटाचा संसार थाटला असता. पण हं. आता काय त्याचं ?

**तोतरं०**—आता मेलास तर रडायलाही नाहीं कोणी मागं. आता पैकाप्रपंच हवा कशाला ? आता सारा परमार्थ.

**बहिरं०**—परमार्थ ? म्हणजे काय बुवा ?

**तोतरं०**—पर म्हणजे दुसरा, अर्थ म्हणजे पैसा—

**बहिरं०**—आणि मध्यें मा राहिला तो ?

**तोतरं०**—सांगतों—सांगतों. धीर धर. अरे मा म्हणजे आई.

**बहिरं०**—तेव्हां परमार्थ म्हणजे—

**तोतरं०**—आई शपथ जवळ जो काहीं पैका असेल नसेल तो दुसऱ्याला देऊन

टाकणं—अर्पण करणं. काय समजलं ?

**बहिरं०**—अगदीं समजलं ! आणि तूं सुद्धां आपला लेक गोप्या, त्याच्या ढुंगणाला लुगडं गुंडाळून नि आईशप्पथ त्याला गुरुला अर्पण करून साधला आहेस खरा परमार्थ.

**तोतरं०**—सरक् भयो.

**बहिरं०**—आणि तोतरंभटा, माझ्या संग्रहीं या साडेतीन हात देहाशिवाय कुणीच माणूस शिल्लक नाही; तेव्हा तुझ्या या मठवासी महंत स्वामीशी वशिला लावशील तर मिशा भादरून नि या शेंडीचं गंगावन करून होतों मीही कन्याकुमारी सती. कर अर्पण मला तुझ्या स्वामींना आणि घडूं दे माझेही हातून परमार्थ.

**तोतरं०**—चल, सरक् भयो. वात्रट कुठला.

**बहिरं०**—अस्सं. आणि मघापासून तूं चालवला आहेस वात्रटपणा तो रे ? मग चल सीध्या मार्गानं काढ निम्मे नाणं. नाहीतर खून पाडतों तुझा इथं. [ नरडीला हात घालतो. ]

**तोतरं०**—सरक् भयो. खून खून ! धावा धावा ! [ गोप्या येऊन खेंचतो ]

**गोप्या**—चल निघ. हो बाहेर मठाच्या.

**तोतरं०**—[ दुरून ] सरक् भयो.

**गोप्या**—बाबा, कशाला घेतलात मठात या बावळटाला ? अहो इथं येऊन यानं घोटाळा केलान्

**बहिरं०**—छे. इथं घोटाळा केला नाहीं. इथला घोटाळा पाहिला.

**तोतरं०**—अरे बावळटा, काय पाहिलंस ?

**बहिरं०**—जें दिसलं तें पाहिलं !

**तोतरं०**—अरे शिदळीच्या, असं केलंस तरी काय कर्म ?

**बहिरं०**—आतां काय सांगूं कर्म ? शिंदळकीचं जें कर्म दिसलं तें पाहिलं.

**गोप्या**—म्हणजे ? काय दिसलं ? काय पाहिलंस ?

**बहिरं०**—ऐकायचं आहे ? सांगतों. कमाईच्या निम्या वाट्याकरिता तुझ्या बापाला शोधीत शोधीत मी मठाशीं आलों. महाद्वाराशीं द्वारपालानं अडवलं.

त्याला दिली धक्की नि आत आलों. पुढं स्वामींच्या पूजामंदिराच्या द्वारपालाला धक्की देऊन पहिल्या दालनात शिरलों तो तिथं हा गोप्या—

**गोप्या**—काय म्हणालास ? पुन्हा बोल—

**बहिरं०**—छे छे छे. चुकलों. तिथं ही कन्याकुमारी सती गोपिका एका मंचकावर कन्याकुमारी सती रंभेला आपल्या बाहुपाशात घेऊन तिचं चुंबन घेत होती—

**तोतरं०**—आणि हें तूं पाहिलंस ?

**गोप्या**—फुटके डोळे मेल्याचे. खरंच बाबा, याचे डोळे फुटके, पापी, म्हणूनच त्याला तसं दिसलं.

**बहिरं०**—खर आहे बाबा. माझे डोळे पापी; आणि याचे अधर, गाल भरींव नि पुण्यशील.

**तोतरं०**—अलबत्. अरे, कशा झाल्या तरी या सती ! स्त्रिया ! पुण्यशील महंत स्वामींच्या अर्पिता कन्या. कन्याकुमारी सती. त्यात काय बिघडलं ? [ गोप्यास हळूच ] गोप्या, नाहीं ना त्यात काहीं बिघडलं ?

**गोप्या**—छेः हो बाबा. आपल्या मठात गोकुळाष्टमीचा उत्सव व्हावयाचा आहे ना ? त्यात मी कृष्ण आणि सती रंभा राधा अशी आम्हा दोघींची स्वामीच्या अनुज्ञेनं पूजा व्हावयाची आहे. त्या उत्सवाची तालीम चालली होती.

**तोतरं०**—म्हणजे, वेष पालटून रंगी तालीम कीं काय ? लेका, हा स्त्रीवेष टाकून तूं कृष्णाचा पुरुषवेष घेतलास कीं काय ?

**गोप्या**—छे हो, अशीच लुगडं नेसलें होतें. मग रंभेनं धरला माझा पदर. तेव्हां मी म्हटलं—

**सोड सोड रंभे गे पदराला ।**
**धरूं नको सोड ॥ धृ० ॥**
**मी कृष्ण खोटा तूं राधा खोटी ।**
**तुझी माझी नाहीं गे जोड ॥ १ ॥**
**जाउन सांगेन महंत मुनींना ।**
**मोडीन तुझी गे खोड ॥ २ ॥**

**बहिरं०**—अस्सं अस्सं ! म्हणजे राधा आणि कृष्ण ! उत्सवाची तालीम चालली होती. मग काय ? बोलून चालून धार्मिक विधी—परमार्थ. त्यात कसलं आलं आहे पाप ! पण हा झाला एका दालनातला पुण्यविधी.

**तोतरं०**—म्हणजे ? अशी आणखी किती दालनं हिंडलास ?

**बहिरं०**—नाहीं आता फक्त एकच. तिथून पुढील दालनात गेलों तों तेथील सुवर्णमंचकावर आपले अनंगकोटी लचाडनायक, भोगीराज, स्वामीमहाराज कन्याकुमारी सती ऊर्वशीला मांडीवर घेऊन मोठ्या रंगात आले होते.

**तोतरं०**—अरे रे रे रे ! आणि हें तूं पाहिलस ?

**बहिरं०**—हो. मी पाहिलं, हें स्वामीनींही पाहिलं. नि मग त्यांचा झाला विरस. नि अस्सा झाला त्यांच्या अंगाचा तिळपापड की आईबहिणीवरून शिव्या देत, हातात सोटा घेऊन स्वामी माझे पाठीसच लागले.

**तोतरं०**—गध्ध्या, पण प्रथम त्या जागी तूं गेलासच का ?

**बहिरं०**—हो. बाकी तिथं गेलों या पापाचा मी धनी खरा. पण काय हो, स्वामीची ही कोणत्या पुण्योत्सवाची तालीम चालली होती ?

**गोप्या**—तुला खेटरानं बडवायच्या.

**बहिरं०**—हं हं–गोप्या, तोंड सांभाळून बोल.

**गोप्या**—काय करशील ? [ आत महंत गोविंद गोविंद म्हणतो ] हे पहा स्वामीच येत आहेत.

**तोतरं०**—अरे बाबा, आता तरी सरक् भयो—सरक् भयो.

**बहिरं०**—निम्मं नाणं दे की मोठ्या आनंदानं.

**तोतरं०**—एक कवडीही मिळायची नाहीं.

**गोप्या**—उलट द्वारपालाकडून लाथा देतें.

**बहिरं०**—असं आहे ? मग पाहून घेईन. सूड घेईन. तुमची नि तुमच्या मठाची अब्रू चव्हाट्यावर आणीन.

**तोतरं०**—अरे जारे. सरक् भयो.

**गोप्या**—अरे जारे. पैठणच्या वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणानी बादशहाच्या न्यायासना-

समोर स्वामींना खेंचायचा प्रयत्न केला, तेव्हा नाहीं स्वामींनी त्यांना भीक घातली. तर आता तुझ्यासारख्या भटुरग्याच्या टराव टराव डुरकण्याला आमचे स्वामी थोडेच दाद देणार आहेत ? आता बऱ्या बोलानं जातोस कीं खेचूं बाहेर ?

**बहिरं०**—तोंड पहा तुझं.

**गोप्या**—मला अरे तुरे नि या मठांत ? कोण समजतोस तूं मला ?

**बहिरं०**—हं सागूं ? ना पुरुष ना स्त्री ! विराट राजाच्या घरची बृहन्नडा.

**गोप्या**—अस्सं ? मग दाखवतेंच मी कोण तें. [ हाताने खेंचून ]

**गुरु सांगे मजला गुह्य । मारुनि हांक । मी सद्गुरुची लेक ॥**
**गचांडि देऊन खेचिन बाहेर । मारुनि लाथ । मी सद्गुरुची लेक ॥१॥**

**बहिरं०**—[ जातां जाता ] पाहून घेईन. [ जातो. ]

**तोतरं०**—सरक् भयो. [ महंत हातात कमंडलू घेऊन येतो.]

**महंत**—तोतरंभटजी, सती गोपिके, कुठं आहे तो भटुरगा ?

**गोप्या**—कमरेंत लाथ मारून खेंचला मठाबाहेर.

**महंत**—त्याला जिवंत कसा सोडलात ? त्याच्या नरडीचा घोट घ्यायचा. तिथंच त्याचा चेंदामेंदा गोविंदा करायचा. तुम्हीं तें कराल असं मला वाटलं. मला तसं करता आलं नाहीं. कारण मी महंत आहे. क्रोध हा माझा वैरी आहे. हिंसा मला वर्ज आहे.

**गोप्या**—मेल्यापेक्षां मेला करून धाडला आहे त्याला इथून.

**महंत**—नाहीं नाहीं, तेवढ्यानं भागत नाहीं. भगवान वाल्मिक मुनींनी गीतेंत सागितलं आहे, 'ये यथा मां प्रपद्यंते । तान् तथैव भजाम्यहम् । '

**गोप्या**—म्हणजे ?

**तोतरं०**—म्हणजे सरक् भयो.

**महंत**—बराबर ! बराबर ! अगदीं बरोबर ! जे मठाचा भ्रष्टाकार करतील त्याना तथैव म्हणजे तिथल्या तिथंच ठार करा. त्यांचा चेंदामेंदा गोइंदा करा. अहो, पायाला नारू झाला तिथं बिब्याचं काम. कापूर चोळून कसं भागेल ?

पाया झाला नारू । तेथें बांधला कापुरू । तेथें बिभव्याचें काम । अधमासी तों

अधम ॥ देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजाऱ्याचें काम । अधमासी तो अधम । मठाच्या देवमंदिरांत विंचू शिरला, त्यानं मंदिर बाटवलं, त्याला तिथल्या तिथं ठेंचायला हवं होतं. पण मला तसं करतां आलं नाहीं. कारण क्रोध हा माझा वैरी ! हिंसा मला वर्ज !

**तोतरं०**—सरक् भयो.

**महंत**—तुम्हीं ते करायला हवं होतं. तें केलं नाही हा मठाचा गुन्हा घडला आहे आणि त्याचं प्रायश्चित्त घेणं तुम्हांला भाग आहे.

**तोतरं०**—मेरा पितर सरक् भयो.

**महंत**—पण हीं पहा गुरुकृपेनं डोळ्यापुढं अर्धवर्तुळं नाचूं लागलीं. अहाहा, गोविंद-गोविंद. [ डोळे मिटतो. ]

**गोप्या**—ही लागली समाधी. आतां गुरु सांगेल मजला गुह्य । मारुनि हांक । मी सद्गुरुची लेक.

**महंत**—तोतरंभटजी, सती गोपिके, आज एका भटुरग्यानं मठांत शिरून मठ बाटवला. पूजामंदिर भ्रष्ट केलं, गोविंदा केला. याला कारण सुमतीनं माझ्या गालावर गोविंदा केला, तें तुम्हीं शिष्यानी उघड्या डोळ्यांनीं सहन केलात. नामदेवाच्या दासीनं, त्या दुष्ट जनीनं मला दुरुत्तरं ऐकविलीं. तो माझा अपमान तुम्हीं उघड्या कानानीं सहन केलात. आणि याच पंढरींत मी जिवंत असतां त्या आळंदीच्या ज्ञानदेवाचा सत्कार झाला, तो तुम्हीं मोकळ्या हातांनीं सहन केलास हा तुमच्या हातून गोविंदा घडला आहे. या पापाचं प्रायश्चित्त म्हणून उद्यां सुमतीच्या घरच्या भोजनसमारंभांत विघ्न आलं पाहिजे. त्यासाठीं त्यापूर्वी सुमतीचं कारटं जगांतून नाहींसं झालं पाहिजे. त्याचा चेंदामेंदा गोविंदा झाला पाहिजे. आणि हें काम तुम्हां दोघांचे हातून घडलं पाहिजे. बोला बोला. आहे मान्य ?

**गोप्या**—मान्य.

**तोतरं०**—सरक् भयो, पण स्वामीजी हें व्हावं कसं ?

**गोप्या**—तें मी सांगतों. स्वामींच्या सहवासात आमचे इतके दिवस गेले ते काय फुकटच ? प्रथम सुमतीच्या घरीं प्रवेश मिळवून घ्यायचा.

**तोतरं०**—हो, पण तो कसा ? तेंच तर कठीण आहे.

**गोप्या**—अहो तेंच तर सोपं आहे. तिच्या घरीं जातें नि तिला सागतें. समजा. स्वामिजी, तुम्हींच आहात सुमती—

**महंत**—अग समजा का ? समजा का ? मलाही केव्हा केव्हा स्त्रीअवस्था येते. मी बायको असल्याचा मलाही केव्हा केव्हा अनुभव येतो. मलाही केव्हा केव्हा गोविंदा होतो—

**गोप्या**—होय तें आहे मला माहिती. आणि म्हणूनच म्हणतें, समजा तुम्हीं आहात सुमती. तर मी म्हणेन, बाई, हा माझा बाप आणि मी—आम्हीं आहोंत संताचे पायिक. तुमच्या घरचं आजचं जेवणराधण नि वाढणं ही कामं आम्हाला द्याल तर तेवढी तरी संतसेवा घडेल नि तुम्हालाही तेवढी मदत होईल.

**महंत**—होय. पण ती तुम्हाला घरात घेईल कशी ? काल तिनं या गालावर गोविंदा केला, तेव्हा तुम्हाला तिनं माझ्यासंगती पाहिलं आहे. तुम्हीं या मठाचीं माणसं आहात, हें तिला ठाऊक झालं आहे.

**गोप्या**—होईना. मग मी मठाची निंदा करीन.

**महंत**—काय निंदा ? मठाची निंदा ? मठाचा गोविंदा ?

**गोप्या**—हो हो, आणि तुम्हाला लाखों शिव्या हाणीन.

**महंत**—ठीक. सद्गुरुच आहेस झालं !

**गोप्या**—मी बोलेन. बाई या मठाच्या नावाखालीं मी फसलें ग फसलें. त्या ढोंगी महंतानं मला नाडलं, लुबाडलं, ठकवलं ! कसं सपशेल बुडवलं ! अग, तो भोंदू महंत कसा आहे ठाऊक आहे ? मोठा बिलंदर आहे. पट्टीचा लफंग्या आहे. स्वार्थी, मतलबी, कावेबाज, निष्ठूर, माग, ठक, ढोंगी, भोंदू, लुच्चा, पच्चा—

**महंत**—अग हो हो हो हो—हें काय ?

**गोप्या**—अहो तसे तुम्हीं नाहींत. पण बाईला तसं नको का म्हणायला ? एरव्हीं तिथं गृहप्रवेश कसा होईल ?

**महंत**—असं असं. नुसतं म्हणायचं. खरं नव्हे. मग चालेल, चालेल पण हळुहळु चालेल !

**गोप्या**—बरं बाई, हळुहळु सागतें. मग मी म्हणेन. बाई, अहो त्याच्या मठात महंतागिरी आहे कुठं ? आहे ती सारी लफंगेगिरी ! परमार्थ आहे कुठं ? आहे तो सारा धंदा ! याच्या मठाच्या पेढींत शिष्याच्या साऱ्या ठेवी गडप !

**महंत**—ठीक.

**गोप्या**—अहो, कुणीही बाई भेटली कीं तिला हा म्हसोबा म्हणतो कसा 'तूं माझी पूर्व जन्मींची पत्नी, नि या जन्मींची सती !' पूर्वजन्मींचा गोविंदा या जन्मीं करून पार !

**महंत**—वा ! चागलाच गोविंदा चालविला आहेस.

**गोप्या**—अहो काय सांगूं बाई, याला विरक्त कोण म्हणेल ? जेवायला, घृतकुल्या मधुकुल्या नि तैनातीला आवती भोंवती बायका, पायावर पाणी घालायला बायका, पाय पुसायला बायका. आग चोळून स्नान घालायला बायका. अंगाला उटी लावायला बायका. विडा कुटून द्यायला बायका. आणि झोंपतेवेळीं अंग रगडाला ओतीं भोती बायका—बायकाच बायका !—

**महंत**—अग हो हो हो—चालेल, चालेल. पण हळु हळु चालेल !

**गोप्या**—अहो बाई, हा साधु ? हा कसला साधु ? हा कसला संत ?

> **कसला हा संत । ढोंगी भोंदु महंत ॥ धृ० ॥**
> **पैका दिसला डल्ला मारी । बायका दिसल्या डोळा मारी ।**
> **कसला हा संत । पक्का पाजी महंत ॥ १ ॥**
> **भोंती जमवुनि सुंदर ललना । मठास बनवी कुंटणखाना ।**
> **कसला हा संत । लुच्चा पच्चा महंत ॥ २ ॥**

**महंत**—आता पुरे कर. माझे आई, हात जोडतों. पाहिजे तर पायां पडतों. मान्य. यानं प्रवेश मिळाला. तरीपण त्या कारभ्याचा खून ?

**गोप्या**—मानेला नख लावून—

**महंत**—यालाच अक्कल कमी म्हणतात ती. असं पहा. गुरु लागतो तो एवढ्यासाठींच ! तसं केलंत तर तुमच्यावरच वहीम येऊन तुम्हालाच कोतवालींत जावं लागेल त्याची वाट ?

**तोतरं०**—मग आतां याला वाट ?

**गोप्या**—गुरु सांगेल मजला गुह्य । मारुनि हांक । मी सद्गुरुची लेक ।

**महंत**—तोतरंभटजी, हा कमंडलु हाती घे. पहा यांत काय आहे तें.

**तोतरं०**—[ कमंडलु हातीं घेऊन व त्यांतून साप बाहेर काढून ] अरे बापरे ! सरक् भयो. [ पळतो. ]

**महंत**—भेंकड कुठला. गोप्या, उचल तो सर्प. भिऊं नकोस. घे लपवून सोबत. पाळण्यांत नखानं पोराचा गोविंदा करा आणि नागी ठेंचलेला हा साप उशाशीं ठेवा, आणि ठोका बोंब. साप चावून पोरानं गोविंदा केला म्हणून. चला. लागा उद्योगाला.

**गोप्या**—[ स्वगत ] कसला हा संत ? लुच्चा पच्चा महंत. [ जातो. ]

**महंत**—अरे चोरा. काय म्हणालास ? 'पैका दिसला डल्ला मारी । बायका दिसल्या डोळा मारी ।' होय, मारतों डल्ला; मारतों डोळा. कुणाच्या बापाला लुटतों होय ? कुणाच्या आईला मारतों होय ? 'अथ जाया मे स्यात् । अथ वित्तं मे स्यात् ।' म्हणजे मला बायको पाहिजे. मला पैका पाहिजे. हेंच तर आमच्या मठाचं धर्मसूत्र. अरे गोप्या, लेका, तुझं लक्षण ठीक दिसत नाहीं. या सापासारखा तूंही गरळ ओकूं लागलास होय ? मग तुझीही नागी ठेंचायला हवी. नाहींतर एखादे दिवशीं खरोखरच डंख करायचास ! आतां एवढं काम उरकूं दे, कीं तुला नि तुझ्या थेरड्याला त्या ततततत-पपला लाथ मारून मठातून गोविंदा. लेकाचा हा बच्चा कच्चा कसला ? पक्का लुच्चा आहे.

**नाहीं बच्चा हा कच्चा रे असे महा हा लुच्चा रे ॥ धृ० ॥**
**पैका घेई पैका न देई । पैका त्या पुरुषार्थ रे ।**
**पैक्यापायीं लुगडं नेसुन । बने कुमारी कन्या रे ॥ १ ॥**
**कन्या बनला कुमारी झाला । परी न विसरे नारी रे ।**
**मठांत त्याला रंग खेळण्या । हवी सती नित रंभा रे ॥ २ ॥**
**असोन वैष्णव सतींस देई । शिवपंथाची दीक्षा रे ।**
**शिवरात्रीचा उत्सव येतां । लिंग-पुजा तो करवी रे ॥ ३ ॥**

**अनंग पोटीं लबांड नायक । संत मी महंत रे ।**
**पोटिं तयाचे अनंत बाली । दोष परी आजि कळसु रे ॥ ४ ॥**
**महंत हा मी जिवंत असतां । देई मजला गाळी रे ।**
**तोंडावरती शिव्या झांसडी । नव्हे कसा हा पच्चा रे ॥ ५ ॥**

**बहिरं०**—[ प्रवेशून ] अरे चोरानों, कळली सारी कारवाई ! आता पहा तर कशी मजा करतो. तेर पितर सरक् भयां. [ जातो. ]

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—पंढरपूर. सुमतीचें घर. भोजनाची तयारी आहे. पात्रें मांडलेलीं आहेत. उदबत्त्या वगैरे मांडणी. वाढण्याचें काम तोतरंभट सोवळ्यांत करीत आहे. गोप्या ओंवळयानें मदत करीत आहे. ]

**गोप्या**—हं काय ! झालं काम !

**तोतरं०**—हं. पार ! सरक् भयो.

**सुमती**—[ घाईघाईनें आतून येते. ] काय ! झाली इथली सारी तयारी ! बाकी, खरंच सागतें गोपिकाबाई, देवानं तुम्हाला नि तुमच्या वडिलांना सुबुद्धी दिली. त्या ढोंगी साधूची किंमत पटली नि संगत सुटली. आणि वेळींच तुम्ही माझ्या मदतीला धावून आलात, त्यामुळं थोड्या वेळात केवढं काम झालं ! नाहीं-तर मी एकटीनं तरी काय केलं असतं ? तरी तुम्हीं पहातांच अहात, पहांटेपासून मी सुद्धां सारखी खपतें आहे. बाळाला पाजायचं सुद्धा भान राहिलं नाहीं. सकाळीं एकदा पाजून पाळण्यांत ठेवलंय. पण संतांची कृपा. हू नाहीं कीं चूं नाहीं. नि मलाही कामाच्या गर्दीत त्याचं भान नाहीं. नि असं पहा गोपिकाबाई, मला तरी कसं असेल भान ! मला लागलं आहे एकच ध्यान. आज संत आमचे वरीं जेवायला येणार ! आज संतांचे पाय आमच्या घराला लागणार ! खरंच. जना-बाईनी खात्री दिली आहे कीं संत आमचे घरीं जेवायला येणार. मग असं करा गोपिकाबाई, जरा आंत व्हा नि पाळण्यात बाळ उठलं असेल त्याला इकडेच

घेऊन या. स्वयंपाक घरांत नेतें नि त्याला पुन्हा पाजतें. जा. जा कशा. [ गोप्या जातो. ] अहाहा, केवढा भाग्याचा दिवस हा ! केवढा आनंदाचा दिवस हा. आज संताचे पाय आमचे घरास लागणार. संत आमचे घरी जेवायला येणार. [ गोप्या धावत धांवत हातीं मृत बालक व साप घेऊन येतो.]

**गोप्या**—देवा देवा, काय केलंस रे हें ?

**सुमती**—बोला, गोपिकाबाई बोला. काय झालं ?

**गोप्या**—देवा देवा, बाळाच्या जीवाला अपाय कीं हो झाला. मी गेलें तों पाळण्यातून हा साप उतरत होता. त्याला ठेचला नि आंत पहातें तों बाळानं एक किंचाळी फोडून प्राण की हो सोडला.

**सुमती**—हाय रे दैवा. [ मुलाला मांडीवर घेऊन मटकन् खालीं बसते. ] देवा, देवा, काय रे केलंस हें ? बाळा काय रे झालं असं ? [ रडते. ]

**तोतरं०**—[ आतून येऊन ] काय झालं ?

**गोप्या**—[ स्वगत ] अहो व्हायचं तेंच झालं. [ उघड ] सुटला बिचारा.

**तोतरं०**—अररे, सरक् भयो. [ दोघे हेल काढून रडतात व बाजूला हंसतात.]

**सुमती**—बाळा सुकुमारा, आजवर तुझ्या धीरावर दिवस काढले. पण आता तूंही मला सोडून गेलास ? आता कुठं जाऊं ?

**तोतरं०**—[ स्वगत ] मठात.

**सुमती**—कुणाला पाहूं ?

**तोतरं०**—[ स्वगत ] स्वामींना.

**सुमती**—काय करूं रे !

**गोप्या**—कन्याकुमारी सती हो रे.

**सुमती**—बाळा, तुझ्या घरीं संत जेवायला येणार नि तूं उपाशीच की रे गेलास.

**तोतरं०**—सरक् भयो. [ स्वगत ] अहो मेला तो गेला, पण मागं शिजलं अन्न फुकट कीं हो गेलं.

**गोप्या**—( स्वगत ) मेल्यानं सूड कीं हो उगवला. आमच्या पोटात चोरट्या अन्नाशिवाय एक घांस कीं हो नाहीं गेला.

**सुमती**—बाळा, आज संत आपल्या घरीं जेवायला येणार. केवढ्या आनंदांत होतें मी! पण आता केवढं दुःख हें! काय करूं रे? [ हुंदके गिळून ] पण हें काय? मी जर आतां इथं अशी रडत बसलें नि संत इथं आले तर त्यांच्या भोजनाकडे कोण पाहील? गोपिकाबाई—

**गोप्या**—नाहीं हो नाही माझ्यानं एक शब्दही बोलवत नाहीं.

**तोतरं०**— हळव्या मनाची पोर आहे हो माझी. काय करील बिचारी.

**गोप्या**—सुमतीबाई तुमच्यानं तरी कसं बोलवतं?

**सुमती**—गोपिकाबाई, नका रडूं. आता रडून कसं चालेल? संताची यायची वेळ नाहीं का झाली? आतां इथं संत आले नि त्याना हा प्रकार इथं दिसला तर ते विमुख नाही का जायचे? जनाबाईसारख्या थोर साध्वीची पुण्याई फुकट नाहीं का जायची? म्हणून म्हणतें घटकाभर हें दुःख गिळूं नि आधीं संतसेवला सादर होऊं.

**गोप्या**—नाही हो नाही. मला हा आंवडा गिळवत नाहीं मग एवढं दुःख कसं हो गिळूं!

**सुमती**—गोपिकाबाई, ही पहा बाहेर चाहूल ऐकूं येत आहे. संत आले वाटतं? चला, घ्या बाळाला नि आत नेऊन पाळण्यांत वस्त्रानं झाकून ठेवा.

**गोप्या**—आणि पुढं?

**सुमती**—संत जेवून गेल्यावर पुढं दुःख, शोक नि बाळाचं और्ध्वदेहिक.

**गोप्या**—बाई, कसं हो कठोर हृदय तुमचं हें!

**सुमती**—बाई, हरिश्चंद्राची तारामती, श्रियाळाची चांगुणा या आर्य सतींचा आदर्श कमलाकराच्या या सुमतीपुढं आहे. माझ्या सत्वपरीक्षेसाठींच पांडुरंगानं हा प्रसंग मुद्दाम घडवून आणला नसेल कशावरून? तेव्हां येईल त्या प्रसंगाला सादर नको का व्हायला! चला आटपा; घ्या बाळाला आत.

**गोप्या**—देवा देवा, काय हा प्रसंग! माझ्या सोनुल्या रे. [ जातो. ]

**सुमती**—[ हात जोडून ] पंढरीराया, या दीन दासीच्या सत्वपरीक्षेची ही वेळ आहे. यावेळीं मला सती चांगुणेचं धैर्य दे. " माया मोह धरून। कोणी कराल

जरी रुदन । तरी मी जाईन उठोन । सत्व घेऊन तूमचें ।" असं महेश अतीथीनं म्हटलं असतां " माया जाळ सर्व सोडून । मन केलें वज्राहूनि कठीण । चिलयाचें शीर छेदून । वाढिलें अन्न अतीथीसी ।" पंढरीराया, सती चांगुणेप्रमाणंच माझं हृदय यावेळीं वज्राहूनही कठोर कर. [ घाईनें जनाबाई येते. ]

**जना०**—सुमती, सुमती झाली तयारी ?

**सुमती**—हो. सारी तयारी आहे.

**जना०**—मग हे पहा संत आलेच.

[ ' पुंडलीक वरदा हरी विठ्ठल ' या नामघोषात पळीपंचपात्री घेऊन संत येतात व आपल्या आसनावर बसतात. ]

**पड्यांत:—भोजनासि आली संत मंडळी ।**
**आनंद भरला दिग्मंडळीं ।**
**हर्ष जहाला सती सुमती ।**
**सत्व-महिमा हो अती ॥ १॥**

[ पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ' ची गर्जना. महंत हातीं पळीपचपात्री असा येतो. ]

**महंत— पोटभरु संत । झाले कलीमाजि अनंत ।**
**भोजनभाऊ लाडूखाऊ ।**
**अस्सल ना परि सारे दिखाऊ ।**
**कसले हे संत । मुळिं ना अम्हां पसंत ॥ १ ॥**

**जना०**—सुमती, बाई केवढं तुझं भाग्य ? पाहिलंस सारे संत आले. हे एवढेच काय ते राहिले होते. पण ते सुद्धा न बोलावता आपणहून आले.

**महंत**—हो. म्हटलं साऱ्याच संताना आमंत्रण आहे. राहिला असेल आमचा गोविंदा चुकून. जावं झालं.

**जना०**—काहीं वाईट नाहीं झालं. मग या बसा या पाटावर.

**महंत**—कुठं या पंक्तींत ? छः बुवा. बाटेन. हा कोण ? नामदेव शिंपी, नरहरी सोनार ? हा सावता माळी ? आणि हा ? अब्रह्मण्यम् अब्रह्मण्यम् ! हा तर चोखामेळा-म्हार ! म्हाराच्या पंक्तीला बसूं ? छः छे छे. हे पहा मी आपलं पात्र

असं इकडं ओढून काटकोनात हा असाच गोविंदा करतां. [ तसा बसतो. ] आतां ठीक झाला गोविंदा. छे छे धर्म बुडवला या संतानी. सारा भ्रष्टाकार !

**नामदेव**—आम्ही पंढरीचे वारकरी. आपल्या देहावर तुळसमाळेचं तुळसीपत्र ठेवून आपले देह पांडुरंगापायीं अर्पण करणारे नि विवेकाच्या खड्गाने कामक्रोधादि षड्रिपूंवर वार करणारे आम्ही वारकरी हातीं टाळवीणा नि मृदंग घेऊन नि वैष्णवपंथाचा धर्मध्वज उभा पताका त्या खांद्यावर टाकून मुखानं विठ्ठलनामाचा गजर करीत पंढरी गांठणाऱ्या आम्हां या वारकऱ्यांना पंढरीच्या आषाढीच्या या दहिकाल्यांत कसला आला आहे भेदाभेद ?

**एकचि तें तत्त्व एकाकार देशीं । एक तो नेमेसी सर्व जनीं ॥ धृ० ॥**
**ऐसें ब्रह्म पहा आहे सर्व एक । नलगे तो विवेक करणें कांहीं ॥ १ ॥**
**नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद । नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ २ ॥**

**महंत**—हा वेदात मला गोविंदा आहे. पण कायरे ग्यानबा, तूं मोठा ज्ञानी, जातीनं ब्राह्मण, हा मध गोलाकाराचा गोविंदा तूंही करतोस ! कांहीं लाज ! कांहीं गोविंदा !

**ज्ञानेश्वर**—एकच चैतन्य सकळ प्राणीमात्राच्या ठायीं वास करीत आहे. तेथें हा उच्च हा नीच असला भेदाभेद करायचा आम्हाला काय अधिकार ! माझ्या या पार्थिव देहांत वास करणारं सूक्ष्म चैतन्य नि पंढरीरायाचा भक्त, हा चोखामेळा याचे ठायीं वास करणारं चैतन्य, ही दोन्ही एकच. एकाच विराट तेजाचं सूक्ष्म किरण. " हे गुणत्रय रहितु । व्यक्तीसी अतीतु । अनादि अविकृतु । सर्व एक । "

**महंत**—होय रे शहाण्या पण देहाला विटाळ आहे ना !

**ज्ञाने०**—आणि देहाला विटाळ आहे असं म्हणाल, तर ज्या आप-तेज-वायु आदि पंचमहाभूतांपासून हा जडदेह घडला आहे, त्यातल्या कोणत्या भूताविशेषानं देहाला विटाळ होतो, हें सांगू शकाल काय ?

**गोप्या**—[ स्वगत ] हें सांगणार काय हे डोंबल ! हे म्हणणार, राधे तुझा लागला छंद !

**जना०**—आणि देहाच्या विटाळाचाच प्रश्न घ्यायचा तर काय हो महंत, तुमची

ती अर्पिताकन्या, कन्याकुमारी सती—ती ऊर्वशी ! ती हां कोण जातीनं ! अंत्यजच ना !

**महंत**—तो प्रश्न वेगळा आहे. त्यांत गोविंदा आहे.

**ज्ञान०**—आणि म्हणूनच गोविंदाची अशी इच्छा दिसते कीं, हा प्रश्न सध्या राहूं द्यावा. मंडळींची पंक्तीवर खोटी नको.

**नाम०**—मग चला. पांडुरंगाचं ध्यान करून आरंभ करूं. [ आपोष्णी. ]

> **पाहुं द्या रे मज विठोबाचें मुख ।**
> **लागलीसे भूक डोळां माझ्या ॥ धृ० ॥**
> **नामा म्हणे विठो पंढरीचा राणा ।**
> **डोळियां पारणा होत असे ॥ १ ॥**

[ डोळे मिटून हात जोडतो. उघडतो. पुन्हां आपोष्णी. ] हें काय ? नित्याप्रमाणं आपोष्णी केली—पांडुरंगाचं ध्यान केलं, पण पांडुरंग दिसत नाहीं, हें काय !

**ज्ञाने०**—[ आपोष्णी. ] समजलों. ही सारी विधिघटना ध्यानीं आली. अहाहा, पांडुरंगा, तुझी लीला अतर्क्य आहे. देवा, ' तूं आदिमध्यात रहितु । स्वसामर्थ्यें तूं अनंतु । विश्वबाहु अपरिमितु । विश्वाधार तूं ॥ '

**नाम०**—पांडुरंगा.

> **अमृताहूनि गोड रूप तुझें देवा ।**
> **मन माझें विठ्ठला कां ना देखे ? ॥ धृ० ॥**
> **सांगा पंढरिराया काय करूं यासी ? ।**
> **कां रूप ध्यानासी ना ये तूझें ? ॥ १ ॥**

**ज्ञाने०**—अहाहा, देवा—

**अनुमानेना अनुमानेना । श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे ॥ १ ॥**
**तुज सगुण म्हणो कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एक गोविंदु रे ॥२॥**
**तुज स्थूल म्हणो कीं सूक्ष्म रे । स्थूल सूक्ष्म एक गोविंदु रे ॥ ३ ॥**
**निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले । बाप रखुमादेवीवरु विठ्ठलु रे ॥ ४ ॥**

**नाम०**—खास, आजच्या भोजनात काहीं व्यंग आहे. अशुभ आहे. अशौच आहे.

**महंत**—घातपात आहे–गोविंदा आहे. आणि तो तुमच्या या सवगोलाकारी भ्रष्टाकारामुळं आहे.

**जना०**—नामदेवा, पंक्तीची अशी खोटी करून या सुमतीचा असा विरस करणं बरं का ?

**नाम०**—काय करूं ? जने, तुला ठाऊक नाहीं ? आपोष्णीचे वेळीं डोळे मिटताच पाडुरंगाचं दर्शन झाल्याखेरीज मी कधींच अन्नग्रहण करीत नाहीं. मग आजच कसं करूं ? इतर संताची खोटी होत असेल, तर त्यानीं खुशाल जेवावं. पण पाडुरंगानं नित्याप्रमाणं दर्शन दिल्याविना मी पाण्याचा एक थेंब अगर अन्नाचा एक कणही पोटात घेणार नाहीं.

**जना०**—खरंच. माझा नामदेव साजसकाळ पाडुरंगाचं पंक्तीवर दर्शन केल्याखेरीज अन्नग्रहण करीत नाहीं. पण आज हें असं का व्हावं ? याचा उलगडा, ज्ञानी ज्ञानदेवा, तूं तरी करशील काय ?

**महंत**—अग हा ग्यानबा काय सागणार ? मी सागतों. हीं पहा अद्‌भुत वर्तुळं डोळयासमोर नाचूं लागली [ आपोष्णि. ]

**गोप्या**—[ स्वगत ] हं लागली समाधी ! आता राधे तुझा लागला छंद !

**महंत**—[डोळे उघडून] ऐका. नामदेव पाडुरंगाचं दर्शन घडल्याखेरीज अन्नग्रहण करीत नाहीं. आज त्याला दर्शन घडत नाहीं. कारण, या जागीं अशौच आहे. या बाईच्या मुलाचं प्रेत या घरात आहे. आत पाळण्यात त्याचा गोविंदा होऊन पडला आहे.

[ जनाबाई धावत धावत आत जाते. ]

**ज्ञाने०**—पण काय हो महंत, हें तुम्हाला कसं कळलं ?

**महंत**—अंतर्ज्ञानानं. ब्रह्मविद्येनं.

**सुमती**—[ स्वगत ] पाडुरंगा, तुझ्याशिवाय माझी लाज आतां कोण राखणार ? केवळ सत्वरक्षणासाठीं हा पुत्रशाक मी गिळून बसलें आणि आता जर हे संत असे

विमुख गेले, तर माझं सत्वहरण नाहीं का होणार ? [ उघड ] संतजन हो, बाळाला पाजून मी पाळण्यांत निजवला आहे.

**महंत**—खोटं बोलते.

**सुमती**—आपण संकोच न धरता स्वस्थ चित्तानं भोजन करावं नि या दासीला कृतार्थ करावं.

**महंत**—दासीला कृतार्थ करावं, एवढं मात्र खरं आहे.

[ जनाबाई बाळाचें प्रेत घेऊन बाहेर येते. ]

**जना**०—अहाहा धन्य साध्वी ! धन्य सुमती ! पवित्र आर्ये, संतांच्या सेवेसाठीं प्रत्यक्ष आपल्या चिमण्या अर्भकाच्या मृत्यूकडेही कानाडोळा केलास. धन्य तूं.

**महंत**—पहा. माझी संतवाणी कशी खोटी ठरेल ? हा पहा या पोराचा गोविंदा.

[ सर्व संत ' पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ' करीत पंक्तीवरून उठतात. पडदा. ]

---

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला.

[ *स्थळ*—पंढरपूर. राऊळाकडे जावयाचा मार्ग. ]

**सुमती**—बाळा सुकुमारा,

**कैलासपंथ लक्षून । एकला जातोसी मज टाकून ।**
**तुझे संगतीं मी येईन । उभा राहे क्षणभरी ।**
**तूं मोक्षद्वीपाचें केणें धरून । जासी कैलासराजपेठं लक्षून ।**
**तुझे संगतीं मी उद्धरेन । मज टाकूनि जाऊं नको ।**
**तुझी माउली मी म्हणतां । लाज वाटे रे गुणवंता ।**
**तुवां आपुली सार्थकता । करुनि गेलासि शिवपदा ।**
**तूं न येसी जरी धांवून । तरी माझा जाईल प्राण ।**

राजसा, प्राण जाईल ! पण गेला कुठं माझा प्राण ? प्राण गेला बाळाचा, वैकुंठीं पांडुरंगाच्या पायीं. नि माझा प्राण ? अतिथीसत्काराचं सत्व राखण्यासाठीं मन मारलं, हृदय कोंडलं, दुःख गिळलं ! पण आता तरी मन मोकळेपणानं मला रडूं दे. बाळाच्या स्मृतीवर जन्मदात्या मातेच्या आसवाची झिरपण घालूं दे. बाळा वेल्हाळा, कसा रे निष्ठूर झालास ?

**येई परतोनी । बाळा ।**
**जासि कसा रे माते टाकुनी ॥ धृ० ॥**
**जन्मतांचि तव जनकाहि जाई ।**
**टाकुनि अदया आतां तूंही ।**
**होइ व्याकुला माता तव ही ॥ १ ॥**

सती चांगुणेचा चिलया हांक मारतांच दुड्दुड् धावत आला. पांडुरंगा, तें भाग्य या अभागिनीच्या नशिबीं आहे का ? साध्वी जनाबाई बाळाला पांडुरंगाच्या पायीं

घालायला घेऊन गेली. ती म्हणाली, आई मी पुढं होतें. तूं राऊळात ये. तुझा बाळ परत येईल. त्या साध्वी सतीचे शब्द तरी खरे होतील का ? माझं बाळ वैकुंठीच्या पेठेतून परत येईल काय ? [ महंत येतो. ]

**महंत**—येईल, येईल. पण हलु हलु येईल.

**सुमती**—अरेरे. पुण्यासाठीं पदर पसरावा, तों पाप पदरीं यावं, उजेडासाठीं डोळे उघडावे तों नजरेसमोर काळोखी यावी. कुठलं अशुभ आडवं आलं या वेळेला ? [ डोळ्यावर हात ठेवते. ]

**महंत**—सती सुमती, अजून तरी डोळे उघड. उगाच गोविंदा करूं नकोस. माझ्या गालावर एकदा गोविंदा केलास, तुझं कारटं मेलं. झाली चूक अजून सुधार. अर्पण होऊन सती म्हणून मठात चल. मढ्याच जिवंत पोर करतों. तुझ्या कारट्याचा गोविंदा करतों.

**सुमती**—का गाजतोस उगाच दुःखानं पोळलेल्या तुझ्या या बहिणीला.

**महंत**—बहीण ! आमच्या मठाच्या धर्मशास्त्रात बहीण हा स्त्रीवाचक शब्दच येत नाहीं. कोणतीही स्त्री, अर्पण होण्यापूर्वी पित्याची कन्या आणि अर्पणविधीनंतर स्वामींची कन्याकुमारी सती !

**सुमती**—आता हात जोडतें. जाऊं दे मला राऊळात.

**महंत**—राऊळात कशाला ? राऊळात त्या काळ्या फत्तराला काय पाझर फुटायचा आहे ! तिथं तो जिवंत व्हायचा आहे ! चल, मठात चल नि गोविंदा कर. [ सुमती आल्या पावलीं मागे वळते. महंत अडवतो.] अग इकडे कुठं चाललीस ! मठाची वाट ही नव्हे. ही पहा इकडे.

**सुमती**—मेल्या, का छळतोस असा एक सत्वस्थ ब्राह्मणस्त्रीला !

**महंत**—कारण, मीही एक सत्वस्थ ब्राह्मण पुरुष आहें म्हणून.

**सुमती**—मेल्या—

**महंत**—नाहीं, मेलों नाहीं, जिवंत आहें. तुझ्याशीं गोविंदा केल्याखेरीज मरायचा नाहीं. आता मेलं आहे तुझं मूल—

**सुमती**—आग लागली तुझ्या तोंडाला—

**महंत**--छे. तेंही खोटं. ती लागायची आहे तुझ्या कारभ्याच्या मढ्याला. त्याच्या आत मठात चल नि गोविंदा कर. तुझ्या पोराला जिवंत करतों.

**सुमती**—शिव शिव ! पातिव्रत्य पणास लावून माझ्या बाळाला जीवदान मिळायच असल, तर ता देवादारी आहे तिथच असू द्या.

**महंत**--पण तवऱ्यानं कुठ भागायचं आहे ? आताचा माझा गोविंदा नाकार-शील तर माझ्या शापानं तुझा परागंदा नवराही भस्म होऊन मरेल.

**सुमती**—पंढरीरायाची तशीच इच्छा असेल, तर पावित्र्य रक्षणासाठीं माझं कपाळचं कुंकूही पुसायला मी तयार आहें.

**महंत**--मग तर काय सोन्याहून पिवळं. मठाच्या तुझ्या मार्गातला काटाच गेला. मग तसच कर. पूस, कुंकू पूस. नवऱ्याच्या नावाच कुंकू पूस नि मठात चल— गोविंदा कर.

**सुमती**--नीचा, पुरुषासारखा पुरुष तू—

**महंत**--हो. पण मलाही केव्हा केव्हा स्त्रीअवस्था येते.

**सुमती**—दुःखानं गांजलेल्या एका स्त्रीची तिच्या अपंग स्थितीत अशी अब्रू घेतोस ?

**महंत**—अग अब्रूदार माणसाची कामच हीं ! वा:, त्या आळंदीच्या ज्ञानेश्वराची बहीण, ती मुक्ता तुला ठाऊक आहे ? ज्ञानेश्वराची मुक्ता हं ! नामदेवाची जनी नव्हे. ती आहे कैदाशीण फटकळ. पण मुक्ता मात्र खरी स्त्री आहे. ती अंग धूत विवस्त्र बसली असता चागदेव तिथं आला, नि त्याची नजर तिच्यावर पडली, आणि पुरुषासारखा पुरुष असूनही तो लाजला. त्या भेकड पुरुषानं डोळ्यावर हात घेतले. आपण नसते घेतले बुवा ! हो. खरं सागायला कसली आली आहे लाज ! चागला उघड्या डोळ्यानी गोविदा केला असता. पण स्त्रीसारखी स्त्री असूनही त्या मुक्तीन त्याला चागलीं खेटरं दिलीं. देहाव्यतिरिक्त कसला आला आहे स्त्रीपुरुष भेद !

> स्त्रीपुरुष नामें । कापवाळ्या भिन्न । दोहोंस काचन । मूळ एक ।
> घागरी राजण । जरी भिन्नाकृती । मृत्तिका आहे ती । मूळ एक ।
> स्त्रीपुरुषदेह दृष्टीसी निराळे । चैतन्य वेगळें । नाहीं त्यात ।

**सुमती**--मेल्या का सतवतोस गरीब गाईला ?

**महंत**—गाय ? मग अशी लाजते का ? त्या मुक्तीनंच म्हटलं आहे—

जनींवनी हिंडे गाय । परी वस्त्रें नेसे काय ? ।
कोनाडे जसे भितीला । नऊ द्वारें या देहाला ।
जरी गुरुबोध होता । विकल्प ना मनीं येता ।

म्हणून म्हणतों, विकल्प सोड—मठात चल. गुरुबोध घे नि गोविंदा कर.

**सुमती** —शिव शिव ! आता करूं तरी काय बाई ? ऐकवत नाहीत हे शद्ब.

**महंत**—ऐकलेच पाहिजेत. एरव्हीं गोविंदा कसा होईल ? तू माझ्या गालावर गोविंदा दिलास, आता तुझ्या गालावर मला घेऊ दे.

**सुमती**—अस्सं ? मग हा घे. (श्रीमुखात देते. महंत स्तंभित होतो. )

**महंत**—चालेल चालेल. पण हळु हळु चालेल. कसा पण एकदम काडकन् आवाज काढलान्. आता हिचा सूड घेतों. कोतवालीत जाऊन कोतवालालाच घेऊन येतों. चांगला गोविंदा करतों. [ जातो. ]

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—पंढरपूर. राऊळाचा मार्ग. गोरोबा आणि ज्ञानेश्वर. ]

**ज्ञानेश्वर**—गोरोबा काका, तुह्मी जातीनं कुंभार, मी ब्राह्मण. तरी पण आम्हा संतमंडळींत ज्ञान आणि भक्ती यात तुमची योग्यता थोर आहे असंच मी मानतों. असं असता तुह्मींच हा प्रश्न केलात, त्याचं उत्तर देणं भाग आहे. सती सुमतीच्या घरीं भोजनप्रसंगी तिच्या अजाण अर्भकाच्या मृत्यूनं नामदेव विदेह स्थितीत गेला नि मी निर्विकार राहिलों, याचं तुम्हाला आश्चर्य वाटलं. पण काका, पांडुरंगाची ज्ञानदेवी बोलते—

**जें उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।**
**एरव्हीं तत्त्वतां वस्तु जें असे तें अविनाशची ।**
**जरी पवनें तोय हालविलें । आणि तरंगाकार झालें ।**
**तरी कवण कें जन्मलें । म्हणो ये तेथ ।**

**तेंचि वायूचें स्फुरण ठेलें। आणि उद्‌क सहज सपाट जहालें।**
**तरी आतां काय निमालें। बिचारीं पां।**
**तरी येथ कांहीं। तुज शोकासी कारण नाहीं।**
**हे जन्म मृत्यु पाहीं। अपरिहर।**
**उपजे तें नाशे। नाशलें पुनरपि दिसे।**
**हें घटिकायंत्र जैसें। परिभ्रमे गा।**
**म्हणोनि अनादिसिद्ध हें आधवें। होत जात स्वभावें।**
**तरी तुवां कां शोचावें। सांगे मज।**

**गोरोबा**—ज्ञानी ज्ञानदेवा, हाच तर भक्तियोग नि ज्ञानयोग या दोहोंत फरक. पण माझा प्रश्न वेगळा आहे. प्रापंचिकाच्या दृष्टीनं पहाता सुमतीच्या घरी पंक्तीवर हा प्रसंग घडून आला आणि त्याठिकाणी इतके नामवंत संत हजर असता, तिला दुःखमुक्त करायचं सामर्थ्य इतरात नसलं, तरी तुझ्यात खास होतं. पैठणला तूं नाना चमत्कार केलेस, त्यात प्रेतेंही उठवलीस. पण आज या दुःखी, दुबळ्या स्त्रीच्या मुलाचं प्रेत—

**ज्ञाने०**—जिवत उठवणं अशक्य. म्हणूनच तें मी केलं नाहीं.

**गोरोबा**—म्हणजे ?

**ज्ञाने०**—म्हणजे विधिलिखित तसं नव्हतं. पाडुरंगाचा तसा आदेश नव्हता काका पाडुरंगाच्या कृपाप्रसादानं या अल्पवयातहि मला जें काहीं ज्ञान प्राप्त झालं आहे, त्यावरून या पंढरपुरात काल नि आज झाल्यागेल्या गोष्टींचें मर्म अंतर्ज्ञानानं मी जाणलं आहे. जगातील सर्व घटना पाडुरंगाच्या लीलामात्रेंकरून घडत असतात. त्यातीलच आजची हीसुद्धा एक विधिघटनाच आहे. आणि ही लीला घडवून आणण्यात पाडुरंगाचा हेतू—चला मज संगती राऊळात तेथेंच तुह्मास पटवून देतों. तुमची इच्छाच असेल तर मी त्या ठिकाणीं देवाचा धावा करतों. मूल उठणार नाहीं. तुह्मीं करा. तरीही उठणार नाही. आणि निश्चित सागतों, नामदेयानं धावा करताच हें प्रेत उठेल.

**गोरोबा**—म्हणजे ? याचा अर्थ काय ?

**ज्ञाने०**—याचा अर्थ हें असं घडल्यावरच, त्यावेळीं सर्व मंडळीसमक्ष सांगणं उचित. तेव्हा आता प्रथम आपण सर्व मंडळीसह भजनाचा गजर करीत राऊळ गाठूं. नामदेव विदेह स्थितीत पांडुरंगाच्या पायीं आधींच पडला आहे. माध्वी जनाईनं तें प्रेत नेऊन पांडुरंगाच्यापायीं आधीच घातलं आहे.

**गोरोबा**—मग चला. आपणही साऱ्या संतमंडळी समवेत राऊळाच्या महाद्वाराशी जाऊं आणि तिथून विठोबाच्या नावाचा प्रचंड गजर करीत पांडुरंगाच्या पायीं सादर होऊं.

**ज्ञाने०**—होय. आणि त्याच्याच लीलामात्रेंकरून जें घडेल तें पाहूं. मग चला तुम्ही संतमंडळींना आणायला. मी तुम्हास महाद्वाराशी भेटतों.

**गोरोबा**—पांडुरंग ! पांडुरंग ! [ जातो. ]

**ज्ञाने०**—पांडुरंगा, एका तुझ्यावाचून अशा प्रसंगीं आम्हाला कुणाचा आधार ? देवा—

**तूं माझी माऊली । मी वो तुझा तान्हा ।**
**पाजी प्रेम-पान्हा पांडुरंगे ॥ ध्रु० ॥**
**तूं माझी माऊली । मी तुझें वासरूं ।**
**नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥ १ ॥**
**तूं माझी हरिणी । मी तुझें पाडस ।**
**तोडी भवपाश पांडुरंगे ॥ २ ॥**
**तूं माझी पक्षिणी । मी तुझें अंडज ।**
**चारा घाली मज पांडुरंगे ॥ ३ ॥**
**ज्ञानदेव म्हणे तूं । भक्तीचा वल्लभ ।**
**मागें पुढें उभा सांभाळी गा ॥ ४ ॥**

---

# प्रवेश ३ रा

[ **स्थळ**—पंढरपूर. विठोबाचें देऊळ. राऊळात विठोबाची मूर्ती. सिंहासनासमोर नामदेव विदेह स्थितींत. मृत बालक हातीं घेऊन जनाबाई. ]

**जनाबाई**— **निज मातेला सोडुनि कोठें जासी ? ।**
**वद बाळा कोठें असशी ? ॥ धृ० ॥**
**कुल धन्य तुझें, धन्य जनन जगजेठी ।**
**दे माता-पितया पोटीं ॥ १ ॥**
**पति-विरहानें, हृदयीं विव्हल माता ।**
**कां करिसी वज्राघाता ॥ २ ॥**
**एक वर्षहि ना, पुरें लोटलें तुजसी ।**
**तों मृत्युस कवटाळिसी ॥ ३ ॥**
**ही निद्रा का हें मरण ? ।**
**चिरकाल झोंप तें मरण ।**
**मृत्यूंत होइ का श्रवण ।**
**मग श्रवण करी, ही हांक मृत्युचे द्वारीं ।**
**फिर बाळा, ये माघारीं ॥ ४ ॥**

बाळा, केवढ भाग्याचें मरण तुझं ! आज संताचे पाय तुझ्या घराला लागले. त्याच पुण्यक्षणीं तुझं मरण. या अल्प वयांतच इह जन्मीची यात्रा संपवलीस. चिमण्या जीवा, कंटाळलास होय या जगाला ? रागावलास होय पित्यावर जन्मताच तुला टाकून गेला म्हणून ? पण बाळा, काय केला होता अपराध तुझ्या आईनं, म्हणून तिला शोकसागरांत ढकलून निघून गेलास ? पुण्यात्म्या, पाडुरंगानं तुला आपल्या पायीं वैकुंठभुवनीं हाक मारली होय ? पण सुमतीसारख्या आपल्या भक्ताला गांजण्याइतका पाडुरंग तरी कसा कठोर झाला, हा जाब त्याला विचारण्यासाठीं तुझा हा पार्थिव देह घेऊन मी इथं आलें आहे. मग पांडुरंगानं आज्ञा केली तर परत येशील ! माझा पाडुरंग मनात आणीला तर काय न करील !

त्यानं 'अजामीळ उद्धरीला । अंबरीष मुक्तीसी नेला ।' रामावतारांत 'सोडवूनी साता सती । राम अयोध्येसी येती । कृष्णावतारात 'स्तन पाजायासी । आली होती ते मावशी ।' तिच्या उरावरी लोळे । विठो माझा क्रीडा खेळे ।' त्या माझ्या पाडुरंगाच्या पायीं तुझा हा पार्थिव देह ठेवतें नि त्यालाच आळवतें. [ प्रेत पाडुरंगाच्या पायीं घालते. ] विठाई माऊली—

**आम्ही पातकांची राशी । आलों तुझ्या पायांपाशीं ॥ ध्रु० ॥**
**मना येईल तें तूं करी । आतां तारी अथवा मारी ।**
**जनी म्हणे सृष्टीवरी । एक असती तूं बा हरी ॥ १ ॥**

विठाई माऊली, काय केलंस आज हें ? आम्हा भक्ताच्या तोंडाला भर पंक्तीत काळं फासलंस. हे विठाई, ही विपरीत करणी कशी ग केलीस ? त्या साध्वी सुमतीला तुझा बाळ परत येईल असा तुझ्या नावानं मी आशिर्वाद दिला, तो खरा करणं देवा, आता सर्वस्वी तुझ्या हातीं आहे. पाडुरंगा, प्रल्हादाकरिता तूं स्तभीं प्रगटलास, उपमन्यूला क्षीरसागर दिलास, ध्रुवाला अढळपद, नि अंबरीषाला विष्णुपद दिलंस. पंढरीराया, ही तुझी बिरुदावली आजच खोटी होणार काय ? या वेळीं आम्हा भक्ताच्या धावण्या धावून तूं आमचं यश राख; आणि या बाळाच्या मुखात अमृत घालन याला जिवंत कर. पण हें काय ? पाडुरंगा, तुला माझी अजून का रे करुणा येईना. पण मेली माझी नाही तर नाही, पण तुझ्या पायरीवर विदेह स्थितीत पडलेल्या माझ्या नामदेवाची तरी ? देवा, रामावतारात शबरीच्या मुखातली उष्टी बोरं चाखून तिचा तूं उद्धार केलास—

**तारि शबरी तुं रे सुखधामा हे रामा ।**
**चाखुन बोरें ॥ ध्रु० ॥**
**अधन जनां दिनां । बिरुद तुझें रे ।**
**दासि जनीसि । ताराया । रामा ।**
**धावुन ये रे ॥ १ ॥**

काय देवा, तुला माझी नाहींच दया येत ? मग काय ? फोडूं हें कपाळ तुझ्या पायावर ? काय नाही द्रव येत ? काळ्या, अरे पाषाणासारखा कठोर का

झालास ? आतां म्हणूं तरी काय तुला ? भक्तीभावानं रिझवलं, हळुवार शब्दांनीं आळवलं, ओंवी झाली, आता या जनीच्या तोंडची शिवी ऐकायची आहे होय ? मग रखुमाई मातेच्या गळ्याशपथ सांगतें, आता तुला शिवीच हासडीन. गाळीच देईन. काय ? नाहीं येत ? मग घे. शिवीच घे—

**अरे विठ्या विठ्या । मायेच्या कारट्या । मूळ ॥ धृ० ॥**
**तुझी रांड रंडकी झाली । जन्मसावित्री चुडा ल्याली ॥ १ ॥**
**तुझें गेलें मढें । पाहुनि काळ रडे ॥ २ ॥**
**उभी राहुनी राउळीं । शिव्या देत जनी ॥ ३ ॥**

[ पांडुरंग प्रकट होतात. मूर्ती लुप्त होते. ]

**पांडुरंग**—जने, काय आकांत मांडला आहेस ?

**जना०**—या देवा, कल्पांत केला तुम्ही, नि पुन्हा मलाच नांवं !

**पांडुरंग**—काय झाला कल्पांत !

**जना०**—हें पहा इकडे ( प्रेत दाखविते )

**पांडुरंग**—होय; मग जें व्हायचं तेंच घडलं. जने, जगताच्या उत्पत्तीकालीं जे सृष्टीनियम मी घालून दिले, जो विधिनेम मी आखून दिला, त्याला धरून या गोष्टी घडल्या आहेत नि पुढे घडणार आहेत.

**जना०**—मग आजचा हा दुःखाचा प्रसंग ?

**पांडुरंग**—असेल ! सुखदुःख, ज्ञान अज्ञान, प्रकाश तिमिर, असंच हें भवचक्र आहे. आणि याच चक्रनेमिक्रमानं आत असता, आनंदाच्या वेळीं बेहोष न होणं, अगर दुःख प्रसंगीं हताश न होणं हीच स्थितप्रज्ञ स्थिती ! हीच माणसाची खरी कसोटी. अग याच विधिघटनेनुसार होणाऱ्या प्रत्येक घटनेंत दैवी संकेत आहे.

**जना०**—मग आजच्या या घटनेंत—

**पांडुरंग**—काय संकेत आहे तो, धीर धर. थोड्याच वेळांत ज्ञानी ज्ञानेश्वराच्या मुखातून तुला ऐकायला मिळेल.

**जना०**—पण देवा, हें प्रेत ?

**पांडुरंग**—त्याच ज्ञानेश्वराच्या चरणावर घाल.

**जना०**—आणि देवा तूं ? करून सवरून नामानिराळाच !

**पांडुरंग**—खरंच जने, ज्ञानी ज्ञानदेवासारख्या पंडितालासुद्धा ज्ञानेश्वरींत माझं वर्णन करताना शेंकडों ओव्या खर्ची घालाव्या लागल्या. तिथं तूं भावभक्तीच्या एका लडिवाळ शब्दात माझं यथार्थ वर्णन केलंस. आतां खरोखरच मी नामानिराळा राहून, काय काय मजा करतों ती तर पहा. पहा आतां संताची दिंडी इथं येईल. तुला ठाऊकच आहे, नामदेवाखेरीज अगर तुझ्याखेरीज मी कुणालाही या स्वरूपात दिसलों नाहीं. तेव्हा आता मी स्वस्थानी होतों.

**जना०**—देवा, तें काहीं असलं तरी सुमतीच हें बालक जिवंत झालंच पाहिजे.

**पांडुरंग०**—होणाऱ्या गोष्टी होऊन जातील ! पण काय ग जने, नामदेवासारख्याचं सानिध्य लाभूनही मायेचं तुझ्यावरचं दडपण अद्याप हलकं होऊं नये ?

**जना०**—कसं होईल ? देवा, तूं तें मनावर घेतल्याविना कसं होईल ? देवा, माझं माहेर वैकुंठ. रखुमाई विठोबा माझे आईबाप. त्यांनीं माझी मोट बाधली आहे प्रपंचरूपी सासरशीं आणि तिथंच चालला आहे मायेचा हा सासुरवास ! म्हणून म्हणतें देवा,

**विनंति माझी । माझी विठ्ठला । एकदां न्याहो माहेराला ॥धृ॥**
**वासना सासू । सासु क्रूर मोठी । नणंद कामना लागे पाठीं ॥१॥**
**आशा तृष्णा । जावा या नष्ट । सदा त्या छळती मज दुष्ट ॥२॥**
**मद मत्सर । मत्सर दीर । सदा ते करती किरकीर ॥ ३ ॥**
**काम हा पती । पति वरिष्ठ । सदा हो देई मला कष्ट ॥ ४ ॥**
**मायबाप माझे । वैकुंठीचे राजे । रखुमा विठ्ठल नांव साजे ॥ ५ ॥**
**तेथें तुम्हीं । तुम्ही विटेवरी । म्हणोनी प्रार्थितें वैखरी ॥ ६ ॥**

**पांडुरंगः**—अस्सं मग ठीक. लवकरच तुला माहेरचं मूळ येईल. धाडतों मागारा बरं. जने, घाबरूं नकोस.

[ पांडुरंग अदृश्य होतात मूर्ती पूर्ववत् होते. संताची दिंडी येते. ]

**संत—** **अनाथांचा नाथ तूं बा, नांदसि पंढरपुरीं ।**
**पुंडलिकाकारणें ऊभा विठ्ठल वीटेवरी ॥ ध्रु० ॥**
**आषाढी पर्वणीस आले । संत तुझ्या नगरीं ।**
**ज्ञानदेवी पूजिली, प्रेमें चंद्रभागेच्या तीरीं ॥ १ ॥**
**कमलाकर द्विज भक्त तुझा । पत्नी तैं सुमती ।**
**संतांतें भोजना बोलावि सद्भावें सति ती ॥ २ ॥**
**संत गेले पंक्ती बसले परंतु आला घाला ।**
**सुमतीच्या बालका आला मृत्यु तत्काला ॥ ३ ॥**
**भक्तकाजकल्पद्रुम म्हणुनी रुक्मिणि-नायका ।**
**पंढरीराया प्रार्थू उठवीं या बालका ॥ ४ ॥**
**पुंडलीक वरदा हरि विठ्ठल !**

**जना०**—ज्ञानी ज्ञानदेवा, आता पुढं ?

**ज्ञाने०**—पुढं पांडुरंगाची इच्छा.

**जना०**—वा हें ठीक. पांडुरंग घेतो तुझं नाव आणि तूं घे पांडुरंगाचं. देवाचा नि भक्ताचा हा चांगलाच सिद्ध साधक भाव.

**ज्ञाने०**—होय भाव असल्याविना साधकाला सिद्धी कशी मिळेल ?

**जना०**—म्हणूनच म्हणतें भावभक्तीच्या बळावर उठवा हें प्रेत.

**ज्ञाने०**—जनाई, मी मघा गोरोबा काकाना सांगितलं तेंच तुलाही सांगतों. पांडुरंगाची इच्छा तशी नाहीं. हें बालक माझ्या हाकेला उठणार नाहीं.

**जना०**—पांडुरंगानं हें प्रेत तुझ्याच पायीं घालायला सांगितलं आहे. तसं करतें. आता तूं जाणे नि तुझा पांडुरंग जाणे ! ( प्रेत उचलून ज्ञानेश्वराच्या पायी ठेवते.)

**ज्ञाने०**—पांडुरंग ! पांडुरंग जनाई, मग हें बालक उठवायला मी नामदेवाला पाचारतों.

**जना०**—कशाला ! आधी तुमच्या हातून काय तें होऊं द्या नाहींतर निर्वाणीं आहेच माझा सखा नामदेव.

**ज्ञाने०**—मग जनाई, मी तुला निश्चित सांगतो. पाडुरंगाच्या संकेसानुर हें बालक नामदेवाच्या धाव्याशिवाय उठणार नाहीं! मी हाक मारूं ? मारतों. पाहिजे तर गोरोबा काकाकडून मारवतों—इथं जमलेल्या कुणाही संतानं हाक मारली, प्रेम उठणार नाही. पण अनुमान कशाला ? प्रत्यक्ष प्रमाणच दाखवतों. जनाई, घे प्रेत हातात ( जनाबाई घेते ) पाडुरंगा, तुझी इच्छा मी जाणतों. पण या जनाईची खात्री पटवण्यासाठीच तुझ्यावर हें साकडें घालतों आहे. पंढरीराया, तुझं नाव घेऊन, तुझ्या पायींचा पायीक, आळंदीचा हा ज्ञानेश्वर तुझंच तीर्थ या तुलसी पत्रानं या बालकावर शिपडीत आहे. याला जीवदान दे. ॥ ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ।" (तुलसीपत्रानें पाणी सिपडतो—बालक जिवंत होत नाहीं.) पाहिलंस जनाई, झाली खात्री ? आता गोरोबाकाका—

**गोरोबा**—कशाला ? ज्ञानी ज्ञानदेवा, जिथं तुझा शब्द पाडुरंगानं अव्हेरला, तिथं माझा काय पाड ? तरीपण तुझी आज्ञा मला अव्हेरता येत नाहीं. हात जोडायला अगर तीर्थ सिपडायला या गोरोबाला हात नाहींत. म्हणून देवा, मुखानंच तुझा धावा करतों. विठ्ठला, 'तुझा मी कुंभार । नासीं पापाचे डोंगर । पूर्ण कृपा विठोबाची । गोरा कुंभार मागे हेंची ।' पाडुरंगा, कृपा कर नि या बालकाला जिवंत कर. ( मूल उठत नाही )

**ज्ञाने०**—काय जनाई, झाली खात्री ? आता हा चमत्कार पहा. नामदेव, नामदेव. ( टाळी वाजवतो. नामदेव उठतो ).

**नाम०**—पाडुरंग, पाडुरग ! ( पुढें येतो व तल्लीन होऊन गातो ).

> **पतित-पावन नाम ऐकुनि आलों मी द्वारां ।**
> **पतित पावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥धृ०॥**
> **सोडी देवा ब्रीद आतां न होसि अभिमानी ।**
> **पतीत पावन नाम तुजला ठेवियलें कोणी ? ॥ १ ॥**

देवा, मी तुझ्या दारीं आलों तसाच माघारीं चाललों. ( काहीं पावलें जाऊन) पण हें काय ? मी कुठं आहे ? पांडुरंग कुठं आहे ? मी माझ्या ठायीं नाहीं. पाडुरंग पाडुरंगाच्या ठायीं नाहीं. असं हें का व्हावं ? हें नादब्रह्म कसलं ? हें तेज

कसलं ! " मोतियाचा चुरा । फेंकिला अंबरी । विजूचिया परी । कीळ झाले ।" आकाशात मोत्याचा चुरा फेंकावा अगर विजाचा चकचकाट व्हावा तसं हें तेज ! विजेचा गडगडाट व्हावा तसा हा आवाज ! काय ही उन्मनी अवस्था !

**ज्ञाने०**—नामदेवा, बाबा पाडुरंगाचं हेंच अद्वैत् ! हेंच पाडुरंगाचं निराकार निर्गुण रूप ! अर्जुनानं भगवंताला विश्वरूपदर्शन देण्याची प्रार्थना केली, व तें विराटस्वरूप दिसताच, " देवा, विश्वरूप पहाया डोहळे । केलें तियें पावला प्रतिफळें । बापा देखलासि आता डोळे । निवाये तैसे निवाले ॥ "
असं म्हटलं तेंच हें पाडुरंगाच्या विश्वरूपाचें विराट स्वरूप. त्या तेजाचा हा किरण ज्ञानानं हें तेज तुला आकलन होत नसलं तरी अनुभवता येतं आहे.

**नाम०**—नको. ज्ञानदेवा, नको. मला हें नको आहे. मला नेहमींचं पांडुरंगाचं " सुंदर तें ध्यान । उभा वीटेवरी ।' तें पाहिजे आहे. " पुंडलिकाचे भेटीं । युगें अठ्ठावीस वीटेवरी उभा । वामांगी रखुमाई । दिसे दिव्य शोभा । " त्या विठ्ठलाची सावळी, सगुण मूर्ती पाहिजे आहे. अहाहा, विठ्ठल ! विठ्ठल ! खरंच,

" विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन । विठ्ठल स्मरण प्रेमपान्हा ।
विठ्ठलचि ध्यावा, विठ्ठलचि गावा । विठ्ठलाचि पाहों सर्वांभूतिं ।"

**विटाई सांवळे डोळसे रंगा येई हो ॥ ध्रु० ॥**
**कानीं कुंडलांची प्रभा । जैसे चंद्र सूर्य नभा हो ॥१॥**
**गळां वैजयंती माळा । कांसे पीतांबर पीवळा हो ॥२॥**
**नामा म्हणे सगुण विठो । झडकरि यावें पंढरिराया हो ॥३॥**

अहाहा, हें पहा, तेंच सावळें सगुण दर्शन. अहाहा—

**जना०**—सख्या नामदेवा, भेटलाना तुझा विठू देव ? मग मार त्याला हाक आणि उठव हें प्रेत.

**नाम०**—जने, त्याच्याच नामाचा जयघोष करूं. पुढची काळजी त्यालाच. पाडुरंगा, आता माझी सारी चिंता तुलाच आहे.

**आतां माझी चिंता तुज नारायणा ।**
**रुक्मिणी-रमणा वासुदेवा ॥ ध्रु० ॥**

द्रौपदी-संकटीं वस्त्रें पुरविलीं ।
धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥ १ ॥
उपमन्यूची त्वां आळी पुरविली ।
अढळपदीं दिली वसति ध्रुवा ॥ २ ॥
नामा म्हणे करा करुणा केशवा ।
तूं माझा विसावा पांडुरंगा ॥ ३ ॥

बोला, विठ्ठल विठ्ठल विठ्ठल (काही वेळ नामगजर होतो.)
थांबा थांबा. यात दोन हाताच्या टाळीचा अभाव आहे आणि म्हणून हा साद पाडुरंगाच्या कानीं जात नाहीं. पाडुरंगा, तुझ्याच नावाची घेतलेली शपथ पाळण्यासाठीं गोरोबा काकानीं आपले दोन्ही हात छेदून घेतले. पण आज तुझ्या नामगजरात त्याना टाळी द्यावीशी इच्छा झाली आहे. पाडुरंगा, सर्वानीं टाळीसाठीं हात वर करताच काका अंतरीं लाजले. विठ्ठला, तुझ्याच नावानं, तुझ्या भक्तानं घेतलेली शपथ तूं सफल करणार नाहींस ?

वदनीं तुझें नाम अमृत-संजीवनी ।
असतां चक्रपाणी भय कवण ॥ धृ० ॥
जन्म मरणाची काय मज चिंता ।
तुझिया शरणागता पंढरीनाथा ॥ १ ॥
नामा म्हणे तुझें नाम वेळोवेळ ।
म्हणतां कळिकाळ पायां पडे ॥ २ ॥

द्या टाळी. (टाळ्या वाजवतात).

वरती करा कर दोन्ही । पताकांचे अनुसंधानीं ॥ १ ॥
सर्व हस्त करिती वरी । गोरा लाजला अंतरीं ॥ २ ॥
नामा म्हणे गोरोबासी । वरती करावें हस्तांसी ॥ ३ ॥
गोरा थोट वरती करी । हस्त फुटले वरचेवरी ॥ ४ ॥

( पाडुरंग हात फिरवतो. गोरोबास हात फुटतात. हात दिसताच सर्वजण टाळ्या-

बरोबर विठ्ठलनामाचा गजर करतात. पाडुरंग पुन्हा मुलावर हात फिरवतो. मूल जिवंत होतें.)

**जना०**—अगबाई, थाबा थाबा. हें बालक जिवंत झालं.

( सर्वजण ' पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ' म्हणतात. नामदेव तें बालक विठोबाचे पायीं ठेवतो.)

**सुमती**—कुठं आहे माझा बाळ ? जनाबाई, बोला, कुठं आहे माझा बाळ !

**नाम०**—हा घ्या बाई, आपल्या पदरात. ( तिच्या ओटींत मूल देतात.)

**जना०**—अहाहा, धन्य स्वाध्वी सुमती ! सुमती, बाई, मिळाला ना तुझा बाळ ?

**सुमती**—कोण ? माझा बाळ ? अहाहा, माझा बाळ. ( त्याचें चुंबन घेते.)

**नाम०**—होय, बाई हा तुमचा बाळ. नि तुमचे पती कमलाकर परत येऊन घरीं तुमची नि बाळाची वाट पहात आहेत.

**सुमती**—अहाहा, केवढे उपकार या संताचे. [ नामदेवाच्या पायां पडते. ]

**नाम०**—बाई, आम्ही पाडुरंगाच्या पायांचे पायिक. आमच्या पाया कसल्या पडता ? या पाडुरंगाच्या पाया पडा. [ विठोबाच्या पाया पडते. ]

**जना०**—सख्या ज्ञानेश्वरा, गोरोबाकाका, आता बोला माझा नामदेव कच्चं मडकं कीं पक्कं ? कच्चं तर नाहीच. हें चागलं पक्कं मडकं आहे पक्कं !

**ज्ञाने०**—जनाई, तुला, नामदेवाला नि इतर संताना माझ्या तोंडून या पक्केपणाचं वा कच्चपणाचं मर्म ऐकण्यासाठींच, पाडुरंगानं या पंढरींत ही घटना घडवून आणली. नामदेवा, पाडुरंगाचं तुला निकट सानिध्य लाभलं, इतकंच नव्हे तर या महाराष्ट्रांत टाळ मृदंग कुटून नि नुसता विठ्ठलनामाचा हरिगजर करून भावभक्तीच्या बळावर, पाडुरंग प्रसन्न करून घ्यायच्या सोप्या सरळ भक्ती–मार्गाचा प्रवर्तक तूं ! वारकरी सांप्रदायीक सामान्य जनतेला पंढरपूरचें हें पाडुरंग दैवत सहजसुलभ करून देणारा तूं–त्या अर्थानं तुला कच्चा कोण म्हणेल ? तुझी थोरवी अपूर्व आहे ! तरीपण अद्वैताचा मोक्ष मिळवूं इच्छिणाऱ्या मुमूक्षूला ज्ञानमार्गाविना सोय नाही. आणि नामदेवा, तुझ्यासारख्या थोर भगवद्भक्ताचं लक्ष तिकडे खेचावं, याच एकमेव दृष्टीनं गोरोबानीही त्यावेळी तुला कच्चं मडकं म्हटलं. नामदेवा, तूं भक्त आहेस.

पण ज्ञानयोगी व्हावंस अशीच आमची इच्छा नि पांडुरंगाची अनुज्ञा आहे. आणि त्याच संकेतानुसार आज पांडुरंगानं आपल्या हातीं तुला अद्वैताच्या ब्रह्मपदाचा किंचित् अनुग्रह दिलेला आहे. नामदेवा, गुरुविना ज्ञानमार्ग चोखाळतां येत नाहीं. सबब आवढ्या नागनाथ येथील विसोबा खेचर याला आपला गुरु कर नि कृतार्थ हो.

**नाम०**—पांडुरंग. पांडुरंग.

**ज्ञाने०**—जनाई, तुझा नामदेव कच्चं मडकं म्हणजे काय हें कळलं ? अग, तुझ्या नाम्याला कच्चा कोण म्हणेल ? आता खऱ्या अर्थानं कच्चं मडकं तुला पहायचं असेल तर [ महंत येतो. ] तें हें पहा—

**महंत**—अहो, चला. पावलं उचला. असें रेंगाळतां काय ? ( कोतवाल येतो. ) कोतवाल, हें पहा या बाईच्या हातीं तिच्या मुलाचं प्रेत. खून केला आहे तिनं या पोराचा.

**कोतवाल**—कुठं आहे प्रेत ? चला द्या पुढं—

**नाम०**—अहो, कुठं आहे प्रेत ? काय ऐकतां यांचं ? अहो, यांचं डोकं फिरलं आहे.

**महंत**—कुणाचं माझं ? कोतवाल, योच्याच डोक्याचा हा गोविंदा झाला आहे.

**कोत०**—तुमचा हा गोविंदा बस करा. बोला, कुठं आहे प्रेत ?

**महंत**—हें या बाईच्या हातांत.

**नाम०**—अहो महंत, हें मूल जिवंत आहे.

**महंत**—कसं असेल ? त्याचा गोविंदा झालेला प्रत्यक्ष या डोळ्यांनीं मी पाहिला आहे.

**सुमती**—मेल्या, फुटक्या डोळ्याच्या, डोळे फाडून घे नि बघ माझं बाळ जिवंत आहे.

**महंत**—[ स्वगत ] अरेच्या हा काय गोविंदा ?

**कोत०**—काय हो महंत, कोतवालींत खोटी खबर दिलीत. तुम्हांलाच पकडतों.

**महंत**—गोविंद ! गोविंद ! अहो कोतवालसाहेब, खबर खोटी नव्हती. या पोरट्याचा पाळण्यांत खून झाला होता—

[ बहिरंभट वारकरी वेषांत गोप्या व तोतरंभट यांस ढकलीत आणतो.]

**बहिरंभट**—आणि तो या मारेकऱ्यांनीं केला होता. ही गोष्ट अगदीं खरी आहे. याला साक्ष मी आहें. चला व्हा पुढं. हा तोतरंभट आणि हा त्याचा लेक गोप्या—

**गोप्या**—छः हां, मी गोप्या नाहीं. मी गोपिका आहें. कन्याकुमारी सती गोपिकाबाई आहें.

**बहि०**—गोष्ट खोटी आहे. मी सांगतों, हा या तोतरंभटाचा पोर गोप्या आहे. या तिघानी म्हणजे या महंत स्वामींनीं आणि त्याच्या या शिष्य स्वामींनीं या बाईवर पापी नजर ठेवून, हें मूल मारण्याचा कट केला, तो या कानांनीं मी ऐकला आहे. आणि त्या कटाप्रमाणं या महंत स्वामींच्या सांगीवरून या दोघां बापलेकांनीं संगन मतानं बाईच्या घरी पाळण्यांत मुलाचा खून केलेला, वारकऱ्याच्या वेषात त्याचे मागें राहून, या डोळ्यांनीं मी प्रत्यक्ष पाहिला आहे.

**गोप्या**—[ स्वगत ] हं राधे तुझा लागला छंद—

**कोत०**—काय हो महंत, हा काय प्रकार आहे ! हा गोप्या कोण ! बाई की बुवा !

**महंत**—हा गोविंदा कठीण आहे, यांत वेदांत आहे. या गोविंदांत शिराल तर अंत लागायचा नाही. सांगा, मी कोण आहें ! बाई कीं बुवा !

**कोत०**—अर्थात् बुवा !

**महंत०**—छः चुकतां आहात. कळणं कठीण आहे. कारण, बुवा म्हणावं तर मलाही केव्हा केव्हां स्त्री असल्याचा भास होतो.

**कोत०**—मग लुगडं चोळी नेसा कीं.

**महंत**—अहो, नेसतोंच कीं मठात उत्सवाचे प्रसंगीं.

**कोत०**—बस करा ही वटवट. बोला हा गोप्या कोण ! बाई कीं बोवा !

**महंत**—अर्थात बाई.

**कोत०**—मग काय हो, तुम्ही महंत–साधु–बुवा. तुमच्या मठांत बाया कशाला !

**महंत**—वारे गोविंदा. अहो, अनार्य बादशहाचे तुम्ही नोकर. आम्हां आर्यांचें धर्मशास्त्र तुम्हाला कसं कळेल ! अहो—

'वृक्ष तेथें छाया। ब्रह्म तेथें माया। बुवा तेथें बाया असणें कीं।'

**कोत०**—अस्सं अस्सं—ठीक आहे. मग गोप्या, तोतरंभटा, व्हा पुढं नि बोला, या मुलाचा खून तुम्हीं केलात ?

**गोप्या**—छेः बिलकुल नाहीं याला साक्ष हें जिवंत मूल.

**नाम०**—कोतवाल, जरा थांबा. तसं नाही वळायचं. आता पुढं ही चौकशी मी चालवतों. काय रे गोप्या—

**गोप्या**—हं. मी गोप्या नाहीं. गोपिका आहें.

**नाम०**—बरं गोपिके, तोतरंभटजी बोला. तुम्ही खुनाचा प्रयत्न तरी केलात ?

**गोप्या**—छेः हो, बिलकुल नाहीं. हें कुभांड आहे. अरे बापरे ! पण हें काय ? अशी अंगाची आग का होऊं लागली ? हा सर्वांगाला दाह कसला ?

**तोतरं०**—अरे बापरे ! पेटलों !

**गोप्या**—आग ! आग !

**तोतरं०**—भडका !

**गोप्या**—[ सैरावैरा धावतो ] अरं वाचवा-कुणीतरी मला आता वाचवा. आता नाहीं सहन होत.

**तोतरं०**—सरक् भयो. [ गडबडा जमिनीवर लोळतो. ]

**गोप्या**—अहो, थोर थोर संतमंडळी हो, ( नामदेवाच्या पाया पडतो. ) वाचवा हो मला.

**तोतरं०**—आणि मला सुद्धा हो !

**गोप्या**—अरे बापरे, नाहींत. आता या वेदना सहन होत नाहीत.

**तोतरं०**—भडका ! भडका !

**ज्ञानेश्वर**—नामदेव, फिरव हात त्याचे अंगावरून. आणि कर त्यांना व्याधीमुक्त.

**नाम०**—मग बोला, गुन्हा मान्य ?

**गोप्या**—अहो, मान्य म्हणून काय विचारतां ? अगदीं मान्य !

**नाम०**—मग गोप्या, मग बोल तूं कोण ?

**गोप्या**—अहो, मी गोपिका नाहीं. मी गोप्या—

**तोतरं**—माझा मुलगा.

**गोप्या**—या महताच्या सांगीवरून आम्हीं सुमतीच्या घरीं प्रवेश केला.

**तोतरं०**—आणि मी त्याचा खून केला.

**गोप्या**—अहो वाचवा हो मला. फिरून गोपिका होणार नाहीं. मठात जाणार नाहीं. [ नामदेव त्याचे अंगावरून हात फिरवतो. ] अहाहा, शांत झालों ! [ नामदेवाचे पाय धरतो.]

**नाम०**—पांडुरंग ! पांडुरंग !

**तोतरं०**—अहो, माझ्यावरही सरक् भयो करा. फिरून मठात जाणार नाहीं. कन्या अर्पण करणार नाहीं. [ नामदेव हात फिरवतो. अहाहा, सरक् भयो ! [ नामदेवाचे पाय धरतो. ]

**नाम०**—पांडुरंग, पांडुरंग !

**महंत**—अहो, इकडे या; आणि माझ्याही अंगावरून हात फिरवा. हा पहा माझ्याही देहाचा डोंब झाला. अरे बापरे, काय हा गोविंदा ? पेटलों–भाजलों–मेलों ! अहो फिरवा. माझ्याही अंगावरून गोविंदा फिरवा. पाय धरतों. शपथ घेतों. पांडुरंगा शपथ पुन्हा सताना शिष्या देणार नाहीं. मठ चालवणार नाहीं. कन्या अर्पण करून घेणार नाहीं. आहेत त्या आई माई घरोघर धाडीन. बापाच्या–नवऱ्याच्या स्वाधीन करीन. पांडुरंगा शपथ. पण हाताचा गोविंदा या देहावर करा हो. ( नामदेव हात फिरवतो.) अहाहा, गोविंदा झाला ! (नामदेवाचे पाय धरतो.)

**नाम०**—पांडुरंग ! पांडुरंग !

**ज्ञाने०**—अहाहा, पांडुरंगा,

> **आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।**
> **तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥ १ ॥**
> **जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रति वाढो ।**
> **भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचे ॥ २ ॥**

पंढरपूर:

दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।
जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात ॥ ३ ॥

**नाम०** —आणि पांडुरंगा, अखेर या नामदेवाचें तुझ्या पायीं इतकच मागण—

घालीन लोटांगण। वंदीन चरण।
डोळ्यांनीं पाहीन। रूप तुझें ॥ १ ॥
प्रेमें आलिंगिन। आनंदें पूजिन।
भावें ओवाळीन। म्हणे नामा ॥ २ ॥
पुंडलीक वरदा हरि विठ्ठल।

---